संगीत

# रत्नावली नाटिका.



हें पुस्तक

बाळकृष्ण विठ्ठल धामणस्कर

यांनीं केलें

तें

मुंबईंत

"कर्नाटक" छापखान्यांत छापविलें.

---

जुलै १९०३ इ०.

---

किंमत दहा आणे.

# प्रस्तावना.

**श्रीहर्ष** अथवा **श्रीहर्षदेव** या नांवाचा राजा इसवी शकाच्या बाराव्या शतकारंभीं **काश्मीर** देशामध्यें राज्य करीत होता. याच्या नांवावर **नागानंद** नांवाचें नाटक व **रत्नावली** आणि **प्रियदर्शिका** नांवाच्या दोन नाटिका प्रसिद्ध आहेत.

प्रकृत पुस्तक हें वर सांगितलेल्या ग्रंथांपैकीं **रत्नावली** या नाटिकेच्या आधारानें लिहिलें आहे. यांत कित्येक ठिकाणीं प्रयोगाच्या सोईकरितां मूळचा कांहीं भाग कमीज्यास्त करावा लागला. व कांहीं भाग अजीबात गाळून टाकला आहे. एकंदरीनें संविधानक व्यवहारांत घडणाऱ्या सामान्य गोष्टीप्रमाणें साधें असून **कवीनें** त्याची रचना मोठ्या चातुर्यानें केल्यामुळें तें फारच मजेदार झालें आहे. **रा. रा. चिपळूणकर** यांनीं लिहिलेल्या प्रस्तावनेंत ते असें ह्मणतात कीं, "**उत्तररामचरित्र, शाकुंतल, मालतीमाधव,** इत्यादि नाटकांपेक्षां **रत्नावली** नाटक निराळ्या जातीचें आहे, हें मर्मज्ञ वाचणारांचे सहज लक्षांत येईल. पहिल्या प्रकारच्या नाटकांतील **नायक व नायिका** यांचे स्वभाव उदात्त असून, त्यांचें भाषण व आचरण विशेष प्रौढ, गंभीर व धर्मशील आढळतें. **रत्नावलीं**तील पात्रें सुस्वभावी व प्रतिष्ठित खरीं, तथापि त्यांचा कल थट्टा, मस्करी, ख्याली, खुशाली कडेच विशेष; व त्यांच्या भाषणांत, आचरणांत गंभीरपणा कमी, आणि रंगेलपणा ज्यास्त, असें भासतें."

या नाटकांत चित्तास सर्वैथैव वेधून घेऊन त्यास कळवळा आणणारा अशा प्रकारचा विप्रलंबरस किंवा करुणारस नाहीं; तथापि मनोरंजक व खुबीदार असा विनोद फारच मजेचा आहे. आतां मुळांतील रसपरिपाक या ग्रंथांत कितपत साधला आहे याचा निर्णय करणें **सूज्ञ** वाचकांकडेच सोंपवितों.

**ग्रंथकर्ता.**

# ह्या नाटकांतील पात्रें.

सूत्रधार-मुख्य नाटककार.

वत्सराज-[ उदयननायक, ] कौशांबी नगरीचा राजा.

यौगंधरायण-राजाचा मुख्य प्रधान.

वसंतक-राजाचा परम मित्र, विदूषक.

वसुभूति-सिंहलद्वीपच्या राजाचा प्रधान.

बाभ्रव्य-वत्स राजाचा कंचुकी.

विजयवर्मा-वत्सराजाच्या सैन्यांतील एक सरदार.

सुवर्णसिद्धि-एक गारुडी.

नटी-सूत्रधाराची स्त्री.

वासवदत्ता-वत्सराजाची राणी, उज्जनीच्या प्रद्योत राजाची मुलगी.

रत्नावली अथवा सागरिका - सिंहलद्वीपच्या राजाची कन्या, [ नायिका. ]

कांचनमाला-राणीची मुख्य दासी.

सुसंगता-राणीची दासी व रत्नावलीची जिवलग मैत्रीण.

मदनिका, चूतलतिका, निपुणिका, वसुंधरा, - राणीच्या दुसऱ्या दासी.

स्थळ-कौशांबी राजधानींतील राजवाडा व त्या जवळचा बाग.

# पुरवणी.

अंक १ ला पृ० १६.

वैतालिक दुसरा:—(पडद्यांत) ओंवी.

हरितपद्माभा हे इंदुपाद ॥ तव नेत्र कमलातें प्रीतिद ॥
दीससी जणुं प्रत्यक्ष चंद्र ॥ वांच्छिती तूतें उदयना ॥ १ ॥

अंक १ ला पृ० १७ सागरिका:—जातां जातां.

पद.

कधिं पाहिन हा पुनः मदन नयनीं ॥
तनु जाळितसे अरि हि काय ह्मणुनी ॥
बघुनी जलदा नाचे जैसी वनांत ती मयुरिका ॥
करील विपुला वृष्टि ह्मणुनियां धरुनि मनीं कौतुका ॥
परि वायु नेइं तया समुळ हरुनी ॥
तसि देवि मज झाली विरहकारिणी ॥ कधिं० ॥ १ ॥

अंक ३ रा पृ० ६३ वासवदत्ता:-(महाराज उठाउठा इ. भा० ऐ)

पद—"विषय विषातें नच सेवा," ही चाल.

उठा उठा हो प्राणपती ॥ प्रीतीची ती रीत सकलही कळली आजी मज पुरती ॥ ध्रु० ॥ प्रेमरसाचा ठेवा अवघा ॥ राहुंद्या नव कामिनिला, निज कुलशिला, नच योग्य तिला ॥ चोचले हे दावितसां कां करुनि अशा परि तुह्मि नृपति ॥ उठा० ॥ १ ॥

अंक ४ था पृ० ८४ सागरिका:—(हाय हाय चोहोंकडे अभिमय इत्यादि भा० ऐ०)

पद—"भला हुवा मै दी०" ही चाल.

अवचित हा महा भयंकर कसा अग्नि इथें पेटला ॥
ज्वाळा क्रूर अहा तशा करुनियां सन्नीधही पातला ॥

दैवानें गमतें दयाच करुनी हा योग कीं आणिला ॥ झाला अंत अतां मदीय ह्मणुनी आनंद वाटे मला ॥ चाल ॥ भला लाभ हा मला जाहला आज खचित अबलेला ॥ आज ख० ॥ ध्रु० ॥ दुःखित पाहुनि दीन हि कन्या ॥ पावक धांवत आला ॥ आला ॥ पावक० ॥ १ ॥

अंक ४ था पृ० ८८ सागरिकाः—(माझ्या योगानें बाईसाहेबांना फार त्रास झाला इत्यादि भा० ऐ०)

पद—राग, भैरवी–त्रिवट.

अपराधी देवीची ॥ असे मी ॥ अप० ॥ धृ० ॥
जेष्ठ भगिनि ही किति मजसाठीं ॥
ढळढळ रडते होउनि कष्टी ॥
दाखविण्यापरि मुख मज मोठी ॥
वाटे लाजच साची ॥ १ ॥

॥ श्री दत्तप्रसन्न ॥

संगीत

# रत्नावली नाटक.



## मंगलाचरण.

पद—"सांबसुराभरणा॰" या चालीवर.

कुसुमांजलि चरणा ॥ वाहुनि ॥ नमितों गजवदना ॥ वा॰ ॥ वाग्देवीपार्दि लीन होतसे सुखवाया या सभाजनांना ॥ धृ॰ ॥ आद्य कवी सुमती ॥ झाले ॥ प्रियकर या जगती ॥ झा॰ ॥ जनकहि जननी ती ॥ त्यापरि ॥ बुधजन जे असती ॥ त्या॰ ॥ त्या सर्वांच्या पूर्ण कृपेनें बाळकृष्ण विठ्ठल रचि गाना ॥ कु॰ ॥ १ ॥

पद—"साध्य नसे मुनिकन्या" या चालीवर.

कुसुमांजलि हा सकलां ॥ मंगल देवो तुह्मां सुजनांला ॥ धृ॰ ॥ पादाग्रावरि राहे निश्चल ॥ परीकुचभारें लवली कोमल ॥ ऐशा जगदंबेनें ॥ शंभुशिरीं जो अर्पण केला ॥ कु॰ ॥ शंकर पाहे प्रेमें जियेला ॥ देह जियेचा पुलकित झाला ॥ पाहुनि जी निजपतिला ॥ लज्जेनें करि नत वदनाला ॥ कु॰ ॥ लक्षुनियां मग शंकर भाला ॥ अधोमुखानें फेंकुनि दिधला ॥ परि मार्गांतचि पडतां ॥ परिमळ ज्याचा बहु परि सुटला ॥ कु॰ ॥ १ ॥

साकी.

विजयशशीचा असो सर्वदा नमितों सकल सुरांला ॥
कोणी द्वेष न करो द्विजांचा मही स्वयें अपुल्याला ॥
पाहो धान्ययुता ॥ जय श्रीहर्ष चंद्रकांता ॥ धृ॰ ॥ १ ॥

( याप्रमाणें मंगलाचरण झाल्यावर )

**सूत्रधारः**—पुरे पुरे, फार विस्तार कशाला? सांप्रत वसंतोत्सव प्रसंगेंकरून श्रीहर्षचरण कमलांच्या प्रसादानें उपजीवन करणारे अनेक देशांतून आलेले राजे व लोक यांनीं आज मला मानपुरःसर बोलावून सांगितलें आहे कीं, "आमचा स्वामि जो श्रीहर्ष राजा, त्यानें अपूर्व संविधानालंकृत अशी रत्नावली नांवाची उत्तम नाटिका रचिली आहे असें ऐकतों; परंतु अद्याप तिचा प्रयोग पाहिला नाहीं. तर कृपा करून सकल जनांच्या हृदयास आनंद देणारा असा जो हा कविराज, ह्याच्या सन्मानार्थ व आह्मांवरही अनुग्रह करावा अशा बुद्धीनें त्वां तिचा प्रयोग करून दाखवावा." ( इकडे तिकडे फिरून व पाहून ) ठीक आहे तर; आतां नेपथ्यसंबंधीं सर्व तयारी करून त्यांच्या इच्छेप्रमाणें वागतों. ( सभेकडे पाहून ) वाहवा, ह्या सकल प्रेक्षकसमाजाचीं अंतःकरणें इकडे एकजीव लागून राहिल्याप्रमाणें दिसत आहेत.

**पद**—"राग मांड-ताल, दादरा."

**जमला हा गुणगण या स्थानिं नेटका ॥**
**दाखवितों आजि यांस मदीय कौतुका ॥ धृ० ॥**
**श्री हर्षे रत्नावली रम्य नाटिका ॥ अर्पियली आवडती सकल कामुका ॥ हंसक्षीर न्यायें गुणदुग्ध प्राशका ॥ नाटकि मी परमचतुर आहे ठाउका ॥ १ ॥**

तर आतां घरीं जाऊन संगीतास आरंभ करावा हें चांगलें. ( इकडे तिकडे फिरून व पडद्याकडे पाहून ) हेंच आपलें घर. तर आतां आंत जावें. ( आंत गेल्यासारखें करून ) आर्ये इकडे ये बरें.

**नटीः**-

**पदः**—"व्यर्थ आह्मीं अबला" या चा०

**सुज्ञ तुह्मीं असतां ॥ प्रिया हो सु० ॥ धृ० ॥**
**नाट्यप्रबंधीं स्वच्छंदानें ॥ अनुदिनः कां रमतां ॥ प्रिया० ॥ १ ॥ दुहितेची स्थिति होईल कैसी ॥ आणा हें चित्ता ॥ प्रिया० ॥ २ ॥**

**सूत्रधारः**—प्रिये, तूंच जर असा धैर्यभंग करूं लागलीस तर हे राजे व लोक आज रत्नावली दर्शनास्तव फार उत्सुक झाले आहेत, यांचें मनरंजन कसें बरें होईल?

**नटीः** – महाराज, तुह्मीं आहां निष्काळजी. तुह्माला काय झालें? मी मात्र दुर्दैवी खरी.

**पद**—" झाली ज्याची उपवर दुहिता " या चा०

**नष्ट जाहली धिषणा नाथा ॥ ह्मणुनि नावडे दुहिता चित्ता ॥ धृ० ॥ घर पर देशीं वरिल कसा तो लाडकि माझी ती गुणवंता ॥ न० ॥ १ ॥ परद्वीपीं त्या होइल कैसें ॥ नकळे बाइ हि जाळी चिंता ॥ न० ॥२॥**

**सूत्रधारः**—

**दिंडी.**

**प्रिये सोडुनि दे दुःख वन्हि हा गे ॥**
**व्यर्थ ढाळिसि हे अश्रु बिंदु कां गे ॥**
**असे अनुकुल जरि दैवगती कांते ॥**
**कार्य दुर्धरही सहज जुळुनि येतें ॥ १ ॥**

( पडद्यांत शब्द होतो. ) सत्यरे भरताचार्या तूं सत्य बोललास.

**साकी.**

**दैव जरी अनुकूळ तरी बहु विकट कार्यही जुळतें ॥**
**अलभ्य वस्तु क्षणांत लाभे कांहिं न कोठें अडतें ॥**
**अनुभव हा सकलां । आला आज पूर्ण मजला ॥१॥**

**सूत्रधारः**—( ऐकून ) ऐकलेंस प्रिये, माझें बोलणें कोणाला तरी अनुभवशीर वाटल्यावरून त्यानें हा मला रुकार दिला, तर कोण हें पहाण्यास आपण जाऊं चल.

( तदनंतर हर्षयुक्त यौगंधरायण प्रधान येतो. )

**यौगंधरायणः**—निःसंशय हेंच खरें आहे. ( दैव जरी अनुकूळ, इत्यादि पुन्हां ह्मणतो. ) दैवाधीन कांहींच नाहीं, असें ह्मणावें तर अशा गोष्टी कधीं तरी घडून आल्या असत्या काय? आह्मीं

सिद्ध वचनांवर विश्वास ठेऊन सिंहलद्वीपच्या नृपतीजवळ त्याच्या कन्यारत्नाची मागणी करावी. ती त्याला मान्य होऊन, त्यानें आपली मुलगी महासागरांतून गलबतावर बसवून इकडे पाठवावी. मध्यंतरीं तुफान होऊन तें गलबत फुटून त्याचे तुकडे व्हावे, असा बिकट प्रसंग आला असतां त्या कन्येला एका फळीचा आश्रय मिळावा आणि तशा प्रसंगीं त्याच महासागरांतून आमच्या कौशांबीचा व्यापारी गलबतांत बसून येत असतां ती त्यांच्या दृष्टीस पडावी व त्यानें तिला आपल्या गलबतावर घेऊन बरोबर आणावी आणि आमच्याच हवालीं करावी; इत्यादिक सर्वच अकल्पित प्रकारांवरून पाहतां, दिवसेंदिवस आमच्या महाराजांचा उत्कर्ष होत चालला आहे यांत संशय नाहीं. असो. त्या राजकन्येच्या गळ्यांतील रत्नमालेवरून मला तिची ओळख पटली. आणि मी तिला मुद्दामच राणीसाहेबांच्या हवालीं केली. हेंही एका प्रकारानें चांगलें केलें असें ह्मटलें पाहिजे. आतां दुसरा प्रकार असा कीं, आमचा बाभ्रव्य नांवाचा कंचुकी, जो मी याच कामाकरितां सिंहलद्वीपास पाठविला होता, तो व सिंहलेश्वरानें आपल्या प्रियकन्येबरोबर पाठविलेला आपला प्रधान वसुभूति, हे दोघेही सुदैवानें समुद्रांत न बुडतां किनाऱ्यास लागले आणि आह्मीं कोशलदेशावर पाठविलेला जो रुमण्वान सेनापति, त्याला भेटले. याप्रकारेंकरून वास्तविक पहातां कधीं न घडणाऱ्या गोष्टी घडून येत आहेत. यावरून मी—

पद—[ गज्जलचे चालीवर. ]

**उत्कर्ष स्वामिचा करावयास यत्न हा ॥**
**योजियला तो सुदैवें जुळतसे पहा ॥**
**नयनि बघुनि अकल्पित गोष्टि या महा ॥**
**होईल गमे पूर्ण सकल कार्यभाग हा ॥ १ ॥**

( पडद्यांत वाद्यें वाजूं लागतात, तीं ऐकून )

पद—'अरे सुवे छोड मुझे' या चा०

**ताल मृदंगादि विविध वाद्यें मधुर वाजती ॥ ध्रु० ॥**
**साथ घेउनि त्या पुरजन प्रेमें ॥**

करिती गान लहान थोर तान छान मारिती ॥१॥
त्याचाच हा ध्वनि सुस्वर आहे ॥
मदनोत्साह करितां हर्ष भरित हे कीती ॥ २ ॥

( लक्ष्यपूर्वक पाहिल्यासारखें करून. ) वाहवा! हे आमचे महाराजही मदनमहोत्सवाची मौज पाहण्याकरितां गच्चीवर चालले आहेत; तर आपणही तिकडेच जावें.—

पद—"चाल प्रबंध"

कामसम वत्स नृप येत संतोषुनी, पाहण्या उत्सवा वसंताच्या ॥ ध्रु० ॥ मदनरतिमान् जसा हाहि भासे तसा, वागला अंतरीं सज्जनांच्या ॥ प्रियवसंतक जयां तेंवि हा सत्य हें शांतविग्रह चरित सत्यवाचा ॥ १ ॥

असो. आतां आपल्या घरीं जाऊन आरंभिलेलें कार्य शेवटास जाईल अशा विचारास लागावें, हें चांगलें आणि हेंच आपलें कर्तव्य होय. (जातो.)

( हा विष्कंभक झाला. )

( तदनंतर वसंतोत्सवसंबंधीं पोषाख करून राजा विदूषकासह बंगल्याच्या पुढील गच्चीवर प्रवेश करतो. )

राजाः—मित्रा वसंतका, ( हर्षातिशयानें. )

पद—" लालशाल जो० " ही चाल.

आनंदित मी झालों स्वमनीं भोगुनि निष्कंटक महिला ॥
घेतां सौख्यानुभव मानितों तुच्छ तया देवेंद्राला ॥ ध्रु०॥
शत्रु जिंकुनी राज्यभार तो सचिवां वरती ठेवियला ॥
जिकडे तिकडे पूर्ण शांतता कोणि न देति दोष मला ॥

आणखी पहा.—

पद—"शैवल विरहित पुष्कर जैसें" या चा०

न्यायबलानें वागुनि हें मी ॥ शोभविलें सिंहासन नामी ॥ ध्रु० ॥ उत्सव हा त्या सुमधन्व्याचा ॥ परि नच लेशही त्याला याचा ॥ सौख्य भोगितां उत्सव साचा ॥ वाटतसे मज सकलहि कामीं ॥ न्या० ॥

दुसरा प्रकार असा कीं, प्रद्योत नरपतीची कन्या वासवदत्ता मजवर पूर्ण अनुरक्त आणि तुझ्यासारख्या मित्राचा सहवास अहोरात्र मग हा उत्सव कामदेवाचा असें न मानतां मी आपलाच मानावा, हें मला योग्य दिसतें. कारण–यांत त्या अनंगाचे मनोरथ किंचित्ही पूर्ण न होतां माझे मात्र हेतु सांगोपांग पूर्ण होत आहेत. असें जर आहे, तर हा आपलाच उत्साह मानून घेण्यास काय चिंता आहे?

**वसंतकः**—मित्रा, तूं ह्मणतोस तें एके अर्थी खरें वाटतें, तरी मीं संशयरहित होत्साता असें ह्मणतों कीं, सांप्रत जो हा उत्सव चालला आहे, तो त्या कामदेवाकरितां नाहीं आणि तुझ्याकरितांही नाहीं, तर केवळ ह्या एकट्या भट्टोबाकरितां आहे, असें मी किंवा या लट्ठ भटानें कां मानूं नये बरें? पूर्ण विचार करून सांग आणि मग पाहिजे तर हा आपल्याकरितां आहे असें ह्मण. अरे, तूं एवढा मोठा पृथ्वीपति राजा आहेस तरी मजपाशीं सलगीनें वागतोस, असें आहे तर चाललेला आनंदोत्सव आपल्यासाठींच असें मानणें मला भाग व तें कबूल करणें तुलाही योग्यच नाहीं का होणार?

**राजाः**—तुझ्या समजुतीप्रमाणें तूं मानतोस तेंही ठीकच आहे.

**वसंतकः**—अरे मित्रा, इकडे पहा तरी अमळ! मद्य प्राशन करून रंगांत आलेले युव युवती जन हातांत रंगाच्या पिचकाऱ्या घेऊन एकमेकांच्या अंगावर रंग उडवीत व नाचत असल्यामुळें पाहणाऱ्यांस मोठीच मौज दिसत आहे आणि त्यांनीं स्वच्छंदानें वाजविलेल्या करताल ध्वनिनें मोठमोठाले मार्ग नादित होऊन राहिले आहेत. त्याचप्रमाणें त्यांनीं एकमेकांच्या अंगावर उडविलेल्या अबीर गुलालानें दाही दिशा व्याप्त करून सोडल्या आहेत.

**राजाः**—खरोखर, यावेळीं नागरिक जनांचा आनंद परमावधीला पावला आहे.

पद—"आला वनमाळी रात्रीं" या चा०

**आनंदें क्रीडताती पुरजन हे विविध परी ॥**
**रमणीया शोभतसे या समयीं ही नगरी ॥ धृ० ॥**

फेंकिती अबीर बुका कुंकुमादि अंबरीं ॥ हा प्रातःसमय रम्य भासतसे अंतरीं ॥ हेम रत्न अलंकार चमकताति किती तरी ॥ यांनीं लुटुन आणिली मला गमे कुबेर पुरी ॥

त्याचप्रमाणें आणखी पहाः—

पद—"नृपतनयेवर हें मन माझें" या चा०

दंग होउनी रंगेले जन पिचकाऱ्या घेउनि हातीं ॥ रंगाच्या किती धारा सोडिति वेश्यांच्या अंगावरती ॥ ॥ धृ० ॥ पूर तो पहा चालला क्षितीं ॥ चिखल अंगणीं जाहला किती ॥ तरुण तरुणिही त्यांत खेळती ॥ प्रेम आपुलें व्यक्त दाविती ॥ चाल ॥ मज गमती ॥ रम्य किती ॥ धन्य असति हे या जगतीं ॥ दंग० ॥ १ ॥

वसंतकः—मित्रा, खरोखर हे रंगेल तरुण पुरुष क्रीडासंगांत दंग असलेल्या वेश्यांच्या अंगावर रंगाच्या अभंग धारा सोडीत असल्या कारणानें त्या पहा कशा सीत्कार सोडीत आहेत.

राजाः—मित्रा, आणखी ही गम्मत पहा—

पद—"लालबागेच्या तूं माझ्या" या चा०

फेंकिती अतीव पहा अंबरीं बुका ॥ म्हणून पडे अंधकार हा वसंतका ॥ धृ० ॥ हेमालंकार त्यांत चमकती किती॥ रत्नजडित पिचकाऱ्या अहिफणाकृति ॥ दिसताती रम्य मनुज चित्त वेधिती ॥ वाटे मज शेट शेष लोक हा निका ॥ १ ॥

वसंतकः—(पाहिल्यें करून) मित्रा, ती पहा मदनिका केवळ मदनाप्रमाणें वसंताभिनय दाखवीत च्यूतलतिकेसह नृत्य करीत इकडेच येत आहे. (मदनिका आणि च्यूतलतिका गात व नाचत येतात.)

मदनिका व च्यूतलतिका—

पद—"मारा जोबन बिना जाय," या चा०

शरदृतूंत ऋतु वसंत असे हा सुखद किती पसंत ॥

॥ धृ० ॥ मारुत वाहे दक्षिणचा हा, क्षणहि न ज्यास उसंत ॥ स्मर भोगा भोगितीं प्रेमें मनुज बुद्धिमंत ॥ ध० ॥ १ ॥ हरि मानही मानि जनांचा पसरी बकुल सुगंध ॥ युवयुवती जना प्रिय संगमीं करितसे बहु धुंद ॥ ध० २॥

**राजाः**—( ऐकून व न्याहाळून पाहून ) अहाहा ! मित्रा—

पदः—" शारदे दास कां० " या चा०

ही दंग करुनि मन भृंग गात निःसंग दाखवी लिला ॥ क्रीडतां वेणिचा बुचडा शिथिल जहाला ॥ धृ० ॥ त्यांतला फुलांचा भला गुच्छ विखुरला भान नच तिजला ॥ भूतलीं पटापट पडुनि सोडि शोभेला ॥ चाल ॥ मद्यांत धुंद ही नाचे ॥ यौवनीं ॥ त्या योगें पैंजण वाजे बहुगुणी ॥ होतसे तोष उरिं माला ॥ पाहुनी ॥ स्तनभार होय अनिवार वक्रता फार पातली कटिला ॥ वाटे ती सोडुनि देत अधो भागाला ॥ ४ ॥

**मदनिका व च्यूतलतिकाः**—

पद—" सुज्ञ तुह्मीं असतां " या चा०

संयम यांत किती ॥ नकळे बाई संयम० ॥
मदनाधीन न होतां केली ॥ या भुवनीं ख्याती ॥ न० १ ॥
मारुत सेउनी मुनिजन फसले ॥ कांहीं नये हातीं ॥ नकळे० ॥ २ ॥

**वसंतकः**—( हर्षातिशयानें ) मित्रा, मीही कंबर बांधून यांच्यामध्यें जातों आणि गाऊन व नाचून मदनमहोत्सव साजरा करितों.

**राजाः**—( हंसून ) तुझी इच्छा असेल तर खुशाल जा.

**वसंतकः**—( कंबर बांधून व दासीच्या मध्यभागीं जाऊन ) अगे मदनिके, अगे च्यूतलतिके, तुह्मीं गातां ती लावणी मला ही इवलीशी शिकवागे !

**मदनिकाः**—अरे भद्या, ही लावणी नव्हे.

**वसंतकः**—तर गे काय आहे हें ?

**मदनिकाः**—अरे मेल्या, हिला ठुंबरी ह्मणतात, समजलास ?

**वसंतकः**—अगे पण या गीताचें काय करितात? लाडू कीं करंज्या?

**मदनिकाः**—(हंसून) हा मेल्या! याचे कसलेरे लाडू नी करंज्या? अरे ही गाण्याची चीज आहे, खाण्याची नव्हे समजलास?

**वसंतकः**—(दुःखित होऊन) असें, असें काय? एकूण ही गाण्याची चीज आहे; यांत खाण्याचें कांहीं नाहींच तर! मग ती मला गरीबाला कशाला हवी? मी आपला जाऊन आपल्या सोबत्या जवळच बसतों. (असें बोलून जाऊं लागतो.)

**मदनिका** आणि **च्युतलतिकाः**–(त्याच्या हाताला धरून) मेल्या खेळायाला आला होतास आणि आतां खेळल्या शिवाय कोठें जातोस? (असें बोलून त्याला दोघी मारूं लागतात.)

**वसंतकः**—(ओढाताण करून त्यांच्या हातांतून सुटतो व राजाच्या मागें जाऊन बसतो.)

**राजाः**—(त्यास पाहून) कां मित्रा, खेळलास?

**वसंतकः**—अरे कसचा खेळ आणि कसचें काय? एकदांचा जीव घेऊन पळून आलों. त्या बटकीच्या पोरींनीं मला पुरे पुरेसें केलें.

**च्यूतलतिकाः**—(स्मरल्यासारखें करून, मदनिकेस) गडे, फार वेळ झाला, म्हणून कदाचित् बाईसाहेब रागावतील. तर आपण त्यांचा निरोप महाराजांस कळवून परत जावं हें चांगलें.

**मदनिकाः**--अगे हो, बरी आठवण केलीस! चल तिकडेच जाऊं.

**दोघीः**--(राजाजवळ येऊन) महाराजांचा जयजयकार असो. महाराज, आमच्या बाईसाहेब अशी आज्ञा करितात-(मध्येंच अडखळून व ओंठ चाऊन.) नाहीं नाहीं, त्या अशी विज्ञापना करितात कीं,–

**राजाः**—(आनंदानें हंसत हंसत) अगे, मदनिके, प्रथम बोलत होतीस तेंच खरें आहे.

**पद**—"सकल भूपती, अहो हे सकल भू०" या चालीवर.

**गोड लागती, अग ह गोड० ॥ बोल मजप्रती ॥**
**सांग सांग काय आज्ञा करित सुमति ती ॥ गो० ॥धृ०॥**

**समय हा किती, तशांत समय हा किती, दंग करि मती ॥**
**मदन उत्सवांत उक्त तीच ही कृती ॥ गोड ला० ॥१॥**

**वसंतकः**—( रागानें मदनिकेस ) अगे दांडगे बटकीचे पोरी, काय कायगे तुझ्या बाईसाहेब आज्ञा करितात? सांग लौकर.

**मदनिकाः**—( विनयानें राजास ) महाराज, बाईसाहेबांची अशी विनंति आहे कीं, आज मकरंदोद्यानांत तांबड्या अशोकवृक्षाखालीं स्थापन केलेल्या भगवान् मदनाची पूजा करावयाची आहे, तर त्या प्रसंगीं महाराजांनीं अवश्य सन्निध असलें पाहिजे. यास्तव त्या वेळीं तिकडे येण्याची महाराजांनीं कृपा करावी.

**राजाः**—( वसंतकास ) गड्या, काय सांगावें आतां?

पद—'वाट बघत द्वारीं' या चा०

**उत्सवत उत्सव हे येति कसे विविध परी ॥**
**रंजविण्या मन्मनास मदनार्चन सुमति करी ॥ धृ० ॥**
**नाहिं तरी अंगहीन मदन जया पूजि प्रिया ॥**
**करस्पर्श सुखोल्हास प्राप्त कसा होय तया ॥**
**अनंगमिषें दंग मला करिताहे प्रेम भरी ॥ उ० ॥ १ ॥**

**वसंतकः**—( आग्रह पूर्वक ) हं चल चल आतां लौकर, मीहि बरोबर येतों. म्हणजे तुझ्या त्या राणीनें पूजेच्या सांगते करितां लाडवाचे वाणबिण दिलें तर माझेंही ब्राह्मणाचें आयतेंच काम होईल.

**राजाः**—मदनिके, तूं जा. हा मी येतोंच तुझ्यामागून मकरोद्यानांत.

( दासी निघून जातात. )

**राजाः**—मित्रा, चला आपणही जाऊं.

**वसंतकः**—हां, चल तर. असा इकडून इकडून ये. ( कांहीं चालून ) मित्रा, हेंच तें मकरंदोद्यान. चल, असा इकडून आंत चल. ( आंत गेल्यासारखें करून व तेथील शोभा पाहून ) महाराज, पहा पहा, ही बाग किती रमणीय दिसत आहे ती; मलयाचलावरून येणाऱ्या सुगंधिक वाऱ्यानें हालविलेल्या उत्तम आंब्यांच्या मोहोराच्या रजःकणांनीं आकाशांत केवळ छत ताणल्याप्रमाणें वरचा

भाग आच्छादित झाला आहे; फुलांतील मधु प्राशन करून उन्मत्त झालेल्या भ्रमरांच्या गुंजारवांत कोकिलांचा मधुर आलाप मिश्र झाला असल्यामुळें उत्तम संगीताप्रमाणें कानाला गोड लागणाऱ्या मंजूळ ध्वनीनें, तुझी स्वारी येत आहे, म्हणून आपल्याकडून सत्कार चालविला आहे कीं काय? असा भास होतो व त्यामुळें हें मकरंदोद्यान विशेष शोभतें आहे.

**राजाः—**

पद—"झुकि आईरे बदरिया सा०" या चालीवर.

**वसंत समयीं पावुनि भ्रांती॥ उन्मत्ता परि हे तरु गमती॥ धृ० ॥ पवळ्यासम नवपल्लव कांतीं ॥ षट्पद गुंजारव वरि करिती ॥ तेणें हे वृक्षचि बडबडती ॥ वाटतसे ऐसें चित्तीं॥ व० ॥ १ ॥ तसेच हे महा बकुल तरु अता ॥ स्वमुळीं अहा पुष्पें जीं देती॥ परी पहा तीं फुलें न असती ॥ मुखासवाला हे वमती ॥ व० ॥ २ ॥ सजुनि युवतिजन सिद्ध जहाला ॥ मद्य पिउनि करी ताम्र मुखाला ॥ दर्शन त्याचें ह्या चाफ्याला ॥ जाहलें असें गमतें चित्तीं ॥ व० ३ ॥**

आणि अशोक वृक्षास लतारूप दोहद करीत असतां तरुणींच्या पायांतील पैंजणांच्या नादाचें अनुकरण हे भ्रमर करीत आहेत कीं काय असें मनाला वाटूं लागलें आहे.

**वसंतकः**—मित्रा, हे भ्रमर पैंजणांचें अनुकरण करीत आहेत असें नाहीं. खरोखरच पैंजणांचा आवाज होत आहे आणि त्यावरून राणी या ठिकाणीं आली असावी असें धोरण दिसतें.

( इतक्यांत कांचनमालेसह राणी वासवदत्ता आणि पूजासाहित्य घेणारी सागरिका आदिकरून )

**राणी वासवदत्ताः—**

पद—"नृपालकोप शांतवीन" या चा०

**सुमंद वात वाहतो पहा किती ॥**
**उपवनास बघुनि होय दंग मन्मती ॥ धृ० ॥**
**रक्तवर्ण तो अशोक दूर किती असे ॥**

**सखे, जिथें अनंगगे, पुजाया आलें ॥**
**धरोनियां प्रिती ॥ सुमंद वात वा० ॥ १ ॥**

**कांचनमाला:**—हा तो अशोक अगदीं जवळ आहे. जी मोगरीची वेल आपण स्वतः आपल्या हातानें लाविली होती, ती ही निरंतर फुलांनीं डवरलेली असते. तशीच ही दुसरी नवमल्लिकेची वेल, हिला पाहिजे त्या दिवसांत फुलांचा बहार येईल, असें कोणी दोहद सांगणारानें सांगितलें आहे. त्यावर विश्वास ठेऊन महाराज दररोज तिच्याविषयीं फार श्रम घेतात, त्या ह्या वेलीच्या पुढें गेलें ह्मणजे तो दिसतो आहे कीं नाहीं, तोच तांबडा अशोक आणि त्याच्याच खालीं अनंगाची पूजा करावयाची आहे. ( असें बोलून अशोकवृक्षाजवळ जातात. )

**वासवदत्ता:**—( वृक्षाकडे पाहून ) हाच तो तांबडा अशोक वृक्ष. अग, आण पाहूं तें सर्व पूजासाहित्य.

**सागरिका:**—( पुढें होऊन ) बाईसाहेब, ही पूजेची सर्व तयारी आहे.

**वासवदत्ता:**—( सागरिकेस पाहतांच ओंठ चावून मनांत ) हा दासींचा केवढा प्रमाद आहे! ही ज्यांच्या दृष्टीस पडूं नये ह्मणून मी इतके दिवस खबरदारी ठेविली, ती अगदीं फुकट गेली. ही आज आयतीच महाराजांच्या दृष्टीस पडणार! ( उघड ) सागरिके, आज अंत:पुरांतील सर्व सेवक मदनमहोत्सावांत रमले आहेत. असें असता तूं त्या मैनेला खेळवावयाचें सोडून इकडे कशाला आलीस? तुझ्या हातांतलें पूजासाहित्य कांचनमालेजवळ दे आणि आतां तरी लौकर तिकडे जा.

**सागरिका:**—( पूजासाहित्य कांचनमालेजवळ देऊन आपल्याशींच. )

पद—"भूपती खरे ते वैभव०" या चा०

**ईश्वरा जरा तरि करुणा येउंदे तुजला ॥**
**किति अंत पहासी मुक्त करी हरि मजला ॥ ध्रु० ॥**

तुजविणें न मजला त्राता या जगिं उरला ॥ जाह-
ला अंत त्या सकल सुखाचा विमला ॥ चाल ॥
सिंहलेशपतीची कन्या ॥ मी परी ॥ भोगितें दासि-
पण येथें ॥ श्रीहरी ॥ परवशता दुर्धर मारी ॥ उरिं
सुरी ॥ शरण मी जाऊं तरि कोण.त्या पदकमला ॥
नाहिंना जगीं मज त्राता एकाह उरला ॥ १ ॥

**वासवदत्ताः**—( तिरस्कारानें सागरिकेस ) अग, पहातेस काय? जा लौकर.

**सागरिकाः**—आज्ञा बाईसाहेब. ( कांहीं चालून मनांत ) सुसंगतेला चांगली बजावून मैनेचा पिंजरा मी तिच्या हवाली केला आहे; तेव्हां ती तिला खेळवीत असेलच.

**अंजनीगीत.**

मम जनकाच्याही अंतःपुरिं ॥ अनंगपूजा होत असे परी॥
येथेंही करितील तशापरी ॥ ह्मणून मी आलें ॥ १ ॥
बघण्याची ती हौस मदंतरिं ॥ बहुत असे यास्तव कोठें
तरि ॥ उभी राहुनी आड अशा परि ॥ पाहिन मी सारें ॥२॥

हो, तिकडे पूजेची तयारी होईपर्यंत आपणही थोडीशी अनंगाच्या पूजेकरितां फुलं तोडावी.

( असें बोलून तेथल्यातेथें फुलें तोडूं लागते. )

**वासवदत्ताः**—कांचनमाले, या अशोक वृक्षाच्या मुळांत भगवान् रतिरमणाची स्थापना कर पाहूं.

**कांचनमालाः**—बाईसाहेब, सर्व तयारी आहे.

**वसंतकः**—( कांहीं फिरून ) मित्रा, आतां पैंजणांचा ध्वनि ऐकूं येत नाहीं, यावरून तुझ्या राणीसाहेब अशोक वृक्षाखालीं येऊन पोंचल्या असाव्या.

**राजाः**—मित्रा, तुझा तर्क खरा आहे. ही पहा राणी वासवदत्ता. अहाहा! या वेळीं ही किती तरी सुंदर दिसत आहे! फुलांप्रमाणें हिची मूर्ति सुकुमार असून कंबर अतिशय बारिक असल्यामुळें उभ-

यस्तनांच्या भारानें किंचित् वांकलेली अशी मदनाच्या जवळ उभी राहिलेली हिची ही मनोहर आकृती मदनमूर्तीच्या बाजूस असलेल्या धनुष्यवल्लीप्रमाणें दिसत आहे. ( जवळ जाऊन ) प्रिये वासवदत्ते–

**वासवदत्ताः**—( किंचित् लाजल्यासारखें करून ) आर्यपुत्राचा जयजयकार असो. हें इथं आसन मांडलं आहे. महाराजांनीं बसून याला अलंकृत करावं.

**पद**—"गुंग्यासे मोरे बतियां" या चा०

**जोडुनि कर विनवी ही दासी तुह्मांस ॥ पुरवावी माझी आस ॥ ध्रु० ॥ व्रत आजि करितें मी मदनपूजा ही ॥ तुह्मि असा साह्य त्यास ॥ जो० ॥ १ ॥**

**कांचनमालाः**—( पूजासाहित्य हातीं देऊन ) बाईसाहेब, हें पूजासाहित्य घेऊन आपण भगवान् प्रद्युम्नाचं अर्चन करावं. ( वासवदत्ता पूजा करूं लागते. )

**राजाः**—प्रिये वासवदत्ते,

**पद**—"सुवर्ण केतकि परि जो दिसतो," या चा०

**आंधीं लावण्यानें जैसी कुसुमापरि सुंदर दिससी ॥ त्यांतहि आतां न्हालिस यास्तव विद्युत्सम मजला गमसी ॥ ध्रु० ॥ नेसलीस हा शालु कुसुंबी योग्य अशा या समयासी ॥ त्या योगानें दिससी मनोहर फारचि या मन्नयनासी ॥ अनंगपूजामिषें लाविसी निजकर अशोक वृक्षासी ॥ नूतन कोमल पल्लव फुटले दुसरे हे गमती त्यासी ॥**

आणखी खरोखरच असेंही वाटतें कीं,

**जाणुनियां स्थिति अंगरहित निज रतिपति निंदिल दैवासी ॥ कारण तव करस्पर्श सुखाचा लाभ न हो कधि ही त्यासी ॥ १ ॥**

**कांचनमालाः**—बाईसाहेब, या अंगरहित कामदेवाची पूजा

तर झालीच. तरी आतां हे प्रत्यक्ष मदनमूर्ति बसले आहेत यांची ही पूजा करावी ह्मणजे झालें.

**वासवदत्ताः**—( हर्षभरित ) अग तर पुष्पहारादिक सर्व पूजासाहित्य आण इकडे; ह्मणजे पूजा करण्यास वेळ नाहीं. ( असें बोलून तिनें दिलेलें साहित्य घेऊन पूजा करिते. )

**सागरिकाः**—( स्मरल्यासारखें करून ) अरेरे! मी वेडी तर खरीच. फुलं वेंचण्याच्या नादांत फार वेळ गुंतून राहिलें. असो. आतां तरी या झाडाच्या आड उभी राहून तिकडे पूजेचा समारंभ कसा काय चालला आहे तो पहातें. ( झाडाच्या आडून वत्सराजास पाहून ) अगबाई! इथं हा प्रत्यक्ष मदन कोणीकडून आला? आमच्या इथं कामदेवाचं चित्र काढून त्याची पूजा करीत असतात; पण इथं तर आज मी याला प्रत्यक्षच पाहिलं. आपणास कांहीं त्याच्या जवळ जायाला मिळायाचं नाहीं. तेव्हां या जाग्यावरूनच त्याची पूजा करावी. ( पुष्पांजलि राजाकडे फेंकून व हात जोडून. )

पद—"मृदुअंकावर सुमती ठेवुनी०" या चा०

**रतिरमणा तव चरणा करित असें मी नमना ॥**
**तव दर्शन मंगलप्रद होवो मज सुखसदना ॥ धृ० ॥**
**इच्छा मनिं बहु होती ॥ पाहिन कधिं तव मूर्ति ॥**
**पाहुनि ती हर्ष किती ॥ झालासे मम चित्तीं ॥**
**व्यर्थ नको दवडूं तो ही आशा मनहरणा ॥ रति०॥१॥**

अगबाई, हें तर मोठेंच आश्चर्य?

पद—"स्फटिकाचे ते पदपथ सुंदर," या चालीवर.

**बघतें बहु जरि या रतिरमणा ॥ शांति न कां तरी ये या नयनां ॥ धृ० ॥ पुनः पुनः बघतें मनहरणा ॥ तरी येथुनि मम पद उचलेना ॥ काय करूं मज कांहिं सुचेना ॥ जाण्यालाही मार्ग दिसेना ॥ ब० ॥ १ ॥**

( शुद्धिवर आल्यासारखें करून ) मला इथं फार वेळ उभं राहतां येत नाहीं. जोंपर्यंत कोणी पाहिलं नाहीं; तोंपर्यंत निघून जावं हें चांगलं.

पद—"लाखोटे कोणी धा० ?" ही चाल.

पाहीन कधिं मी पुन्हां ॥ या रतीकांता ॥ पा० ॥ धृ० ॥
आनंदामधिं बुडवुनी ज्यानें क्षणभरी डोलवियेलें ॥
न सुचे आतां काय करूं तें धीर न उरला स्वांता ॥
पाहिन० ॥१॥

वासवद०:—आर्या वसंतका, हें वायन घे.

वसंत०:—आणा आणा. आह्मी तयारच आहोंत.

वासवद०:—(वसंतकास वायन देऊन हातावर पाणी घालते.)

वसंत०:—स्वस्ति भवतु.

वैतालिकः—( पडद्यांत. )

ओंवी.

अस्तपर्वतीं फेंकुनी किरण ॥ जाय भास्कर नभाखा-
लोन ॥ सभेमाजी सकल लोक मिळोन ॥ वांच्छिती तूतें
उदयना ॥

सागरिकाः—( वैतालिकानें केलेली स्तुति ऐकून ) काय ? राजा उदयन ह्मणतात तो हाच कीं काय! आणि यालाच माझ्या बाबानं मला अर्पण करण्याचा निश्चय केला होता. अहाहा!

पद—"रुचती कां तीर्थयात्रा" या चालीवर.

दास्यत्वें क्षीण केलें मम देहा लागुनी ॥
त्या योगें चित्त माझें बहु विटलें या क्षणीं ॥
पाहुनि ही मदनमूर्ति प्रेमानें तोषुनी ॥
लोभासी वाढवीतें धन्य जगीं मानुनी ॥ १ ॥

राजाः—प्रिये, उत्सवांत मन गुंतल्यामुळें संध्यासमयाचा अतिक्रम झाला तो सुद्धां आमच्या ध्यानांत आला नाहीं. पहा—

पद—"सुटला पितृदिशेचा वारा," या चालीवर.

सुंदर नयनीं बघ लवलाही ॥
दिसते प्राची शुभ्र कशी ही ॥ धृ० ॥
उदयाद्रितटाकीं छपला ॥ प्रियकर सुचवी ॥ जशि पांडु-

रवदनी युवती ॥ पतिला आठवी ॥ १ ॥ शोभा प्रेमळ ही मज भासे ॥ प्रेम न याविण दुसरें खासें ॥ जाऊं प्रासादावरी गडे ॥ कडेवर बस ये ॥ जन वासंतिक उत्सवांत॥ रमती पाहीं ॥ १ ॥
तर प्रिये, चल आतां अंतर्गृहांत जाऊं. ( सर्व जाण्याची तयारी करितात. )

**सागरिका:**—( टक लावून राजाकडे पहात असतां एकाएकीं ) अग बाई! बाईसाहेब निघाल्या कीं काय? मी कपाळ फुटकी खरी.

अंजनीगीत.

डोळेभर अवलोकिन मूर्ती ॥ तरी न त्यासी वेळहि पुरती ॥
दैवगती मम पहा कशी ती ॥ फिरते चौहिंकडे ॥ १ ॥
असो. बाईसाहेब पोंचण्यापूर्वी आपण अंतःपुरांत जावं हें चांगलं.

**राजा:**—( जातां जातां राणीच्या गळ्यांत हात घालून. )

पद—"सुखोपभोगा योग्य नससि तूं०" या चालीवर.

जिंकियलें ह्या चंद्रप्रभेसी तव मुखचंद्रानें ॥
तेजरहित हीं कमलें दिसती कैशी बघ त्यानें ॥ ध्रु० ॥
तव दासीच्या मोहक मंजुळ गायन श्रवणातें ॥
मुकुलित कमलें खालीं घालिती माना म्लानपणें ॥१॥

( असें बोलून सर्व जातात. )

[ पडदा पडतो. ]

**मदनमहोत्सवनामक प्रथमांक समाप्त.**



## अंक दुसरा.

( तदनंतर मैनेचा पिंजरा हातांत घेऊन सुसंगता प्रवेश करिते. )

**सुसंगता:**—हा मैनेचा पिंजरा माझ्या हातांत देऊन माझी प्रियसखी सागरिका गेली तरी कुठं?

(इतक्यांत निपुणिका नांवाची दासी येते, तिला पाहून) अग निपुणिके, अशी आश्चर्ययुक्त मुद्रा करून तूं चाललीस तरी कोणीकडे?

**निपुणिकाः**--कोण ग ती सुसंगता काय? सखे, मला आश्चर्य वाटण्याचं कारण असं कीं, आज श्रीपर्वतावरून कोणी श्रीखंडदास या नांवाचा धार्मिक साधु आला होता; त्याजपासून महाराजांनीं पाहिजे त्या ऋतूंत पाहिजे त्या झाडास फुलं व फळं येण्याची विद्या संपादन केली आणि स्वतः लावलेल्या नवमल्लिकेवर त्या विद्येचा प्रयोग करून अनुभव पाहण्याचं योजलं. तेव्हां "त्या वेलीला फुलांचा बहार कसा काय येतो तो पाहून ये." असं बाईसाहेबांनीं मला सांगितलं होतं; ह्मणून मी तिकडे निघालें आहें. पण तूं एकटीच हा पिंजरा हातांत घेऊन कोणीकडे निघाली आहेस?

**सुसंगताः**--माझी प्रिय सखी सागरिका कोणीकडे गेली अहो याचा शोध करण्यासाठीं मी चाललें आहे.

**निपुणिकाः**--तुझी सखी सागरिका हातांत रंगाचा करंडा, कलमें आणि एक चित्रफलक घेऊन आत्तांच कदलीगृहांत जात असलेली मी पाहिली. तर तूं ही तिकडेच जा आणि मी ही आपल्या कामाकरितां निघून जातें. (असें बोलून दोघी जातात.)

[हा प्रवेशक झाला.]

(तदनंतर मदनव्यथेनें पीडित सागरिका हातांत रंगाचा करंडा, कलमें, व चित्रफलक घेऊन प्रवेश करिते.)

**सागरिकाः**--(आपल्याशींच)

**पद**--'कन्याधन ही ठेव पराची,' या चा०

**ठेवुनि प्रीती दुर्लभ पुरुषीं ॥ हृदया श्रम हे वायां घेशी॥धृ०॥ यद्दर्शन तुज कारण झालें ॥ घाया पहा रे संतापाशीं ॥ १ ॥ त्यासचि मूर्खा पुनरपि होशी ॥ उत्सुक कैसें भेटायासी ॥२॥ वाढलेंस यत्संगें त्या मज ॥ अदया कां रे टाकुनि जाशी ॥ ३ ॥ दर्शन परिचय परिचित परजन ॥ घराच-यातें उत्सुक होशी ॥ ४ ॥**

पण, याची तुला लाज कशी वाटत नाहीं? अथवा-यांत तुझा तरी काय दोष आहे?

पद –"सुने दिलदार गुलरुक०" या चा०

अनंगाच्या शरें भिडनी मना विमला ॥
शरण जासी त्यजुनि मजसी तया प्रबला ॥ ध्रु० ॥
तुझें रक्षण करें माझ्या कसें व्हावें ॥
असें मी नाथ विरहित ही अशी अबला ॥ १ ॥
परी तुजला कशि न वाटे लाज याची ॥
धरुनि शांती मिळवि अंतीं सुसौख्याला ॥ २ ॥

बरं असो. आतां त्या मदनाची थोडीशी विनवणी करितें. (जमिनीवर गुडघे टेंकून व हात जोडून सविनय)

पद—"मेरा गमका" या चा०

अशा अबलाजनांला, मदना रे प्रबला, गांजिसी कां उगा ॥ सांग मजसिं दयाळा ॥ हंत अशांला ॥ गां० ॥ ॥ ध्रु० ॥ सकल सुरासुर जिंकुनि सहजची असतां तूं बहु शूर ॥ अनाथ निर्बल युवती जनांला करावया हतवीर ॥ कशि लाज मनाला न वाटे रे प्रबला ॥ गांजि० ॥ १ ॥

असो. तूंच जेव्हां माझ्यावर प्रतिकूळ झालास, तेव्हां या दुर्निमित्तावरून माझं कपाळफुटकीचं मरण जवळ आलं आहे असं मला वाटतं. मग उगीच तुला तरी बोल लावून काय उपयोग आहे? आतां या ठिकाणीं कोणी आलें नाहीं, तों पर्यंत–

पद—"अंगिकार करुनि इचा गर्व०" या चा०

चित्तचोर तोच रुचिर चित्रिं रेखुनी ॥
प्रेमभरें पाहिन मी येथ बैसुनी ॥ ध्रु० ॥
अन्य मार्ग नाहिं दुजा सौख्य साधनी ॥
मत्समान दैवहीन कोणि ना जनीं ॥ १ ॥

(कांहीं वेळ तसबीर काढीत बसल्यासारखें करून)

पद—"चाल सदर"

**कांपतसे हात भयें करुनि थरथरा ॥**
**परि न दुजा मार्ग करूं काय ईश्वरा ॥**
**पाहुं कुठें नेत्ररमण त्या मनोहरा ॥**
**मदनमार साहुं कसा चैन नच जरा ॥ १ ॥**

( याप्रमाणें बोलून पुनः तसबीर काढीत बसते. )

**सुसंगताः**—( प्रवेश करून ) हेंच तें कदलीगृह, आतां मी आंत जातें. ( पुढें होऊन व सागरिकेस पाहून आपल्याशीं ) हिचं मन तर तसबीर काढण्यांत किती तरी गुंग झालं आहे हें? मी इतकी जवळ आलें तरी ही मला पहात नाहीं. असो. हिच्या आनंदांत आपण अंतराय आणूं नये; तरी ही काय काढते आहे तें पाहिलं पाहिजे. ( हळूच पुढें होऊन पाहिलेंसें करून हर्षानें ) अगबाई! काय हें? हिनें तर आमच्या महाराजांचीच तसबीर काढिली आहे! वाहवा! शाबास!! सागरिके, शाबास!!! एकूण तुझं मन योग्य ठिकाणीं बसलं आणि त्यामुळं मलाही अत्यानंद होत आहे. ठीकच आहे. कमलाकरास सोडून राजहंसी दुसऱ्या कोणत्या ठिकाणीं रममाण होईल?

**सागरिकाः**—(तसबीर पुरी करून व तिच्याकडे लक्षपूर्वक पाहून)

पद—"अरसिक किति हा शेला०" या चा०

**चित्रीं नरवर लिहिला ॥ मनमोहन तो मन्मथ पुतळा ॥ धृ० ॥ प्रेमें पहातें त्याला ॥ परि न दिसे कां मम नयनांला ॥ खळती न अश्रुजलाला ॥ संतत चाले पूर नयनांला ॥ ह्मणुनी मम दृष्टीला ॥ क्षणभरही नच थारा उरला ॥ चि० ॥ २ ॥**

( अश्रु पुसून वर पहाते, सुसंगतेस पाहून चित्रपट लपविते व हंसत हंसत सुसंगतेस ) सखे सुसंगते, तूं केव्हां आलीस? ( तिचा हात धरून तिला खालीं बसविते. )

**सुसंगताः**—( तिनें लपविलेली चित्राची पाटी पुढें घेऊन व तिजवरील चित्र पाहून ) सखे, तूं हें कोणाचं चित्र काढलं आहेस?

**सागरिका:**—अग दुसऱ्या कोणाचं असणार? सांप्रत मदन-महोत्सव चालला आहे, म्हणून मी हें भगवान् अनंगाचं चित्र काढलं आहे.

**सुसंगता:**—( हंसून ) एकूण तुझ्या हाताची सफाई विशेष आहे खरी. अग, पण हें चित्र ओकं ओकं कां बरं दिसतं? (कांहीं थांबून) हो आतां समजलें. तूं एकट्या मदनाचंच चित्र काढलं आहेस; तेव्हां जवळ रति नसल्यामुळं हा उघडा दिसतो. तर आतां मी याच्याजवळ रतीचं चित्र काढतें. म्हणजे रतिमदनाचा जोडा फार नामी शोभेल. ( असें बोलून राजाजवळ हुबेहुब तिचें चित्र काढते. )

**सागरिका:**—(तें पाहून रागानें ) गडे, तूं इथं माझं चित्र कां काढलंस? मोठीच शहाणी दिसतेस तूं! वाहवागे!!

**सुसंगता:**—( हंसत ) अग, तूं उगीच माझ्यावर कां रागावतेस? जसं तूं कामदेवाचं चित्र काढलंस, तसंच मी रतीचं काढलं. बरं पण आतां किती तरी माझ्यापुढं छपविशील? उगीच आढेवेढे घेऊं नकोस. काय असेल तें खरं सांग म्हणजे पुढची तजवीज करण्यास ठीक पडेल.

**सागरिका:**—(आपल्याशीं) हिनं माझी सर्व हकीगत जाणली. असं वाटतं. तर आतां हिच्याजवळ चोरून ठेवण्यांत काय उपयोग आहे? सगळं हिला सांगावं तें बरं. ( उघड ) गडे, खरंच कीं नाहीं, मला सांगायाला भारी लाज वाटते. पण काय करावं? कांहीं सुचत नाहीं म्हणून तुला सांगतें. मात्र ही गोष्ट कोणाच्याही कानीं जाणार नाहीं, अशी खबरदारी ठेव.

**सुसंगता:**—सखे, पुरे आतां, उगीच लाजूं नकोस. असल्या उत्तम कन्यारत्नाचा अशा योग्य वराच्या ठिकाणीं अभिलाष होणें हें अगदी स्वाभाविक आहे. तथापि हा वृत्तांत कोणाला न कळण्याविषयीं मी सावधगिरी ठेवीन. अतां ही चतुर मैना मात्र आमच्या संवादांतील कांहीं शब्द तोंडांत धरून दुसऱ्या समक्ष बोलेल तर न जाणो.

**सागरिका:**—( मोठ्या उद्वेगानें )

**पद**—"कांरे हरी तूं मज छळिसी" या चा०

**मदन दहन करि तनु मम ही ॥**
**विरहभार हा हृदयिं न धरवे त्राण न उरलें ह्या देहीं ॥धृ०॥ निघुन चालले पंचप्राण हे ॥ काय करूं ॥ किति धीर धरूं ॥ कवणास स्मरूं ॥ न सुचे कांहीं ॥ मदन द० ॥१॥**

( असें बोलून मन्मथबाधा दाखविते. )

**सुसंगता:**—( सागरिकेच्या उरावर हात ठेऊन ) सखे, असं काय करितेस हें? थांब जरा. ही जवळ पुष्करणी आहे, मी त्या पुष्करणीतून मोठमोठीं कमलपत्र आणि कमळांच्या देंठ्या घेऊन लौकर तुझ्याजवळ येतें. ( असें सांगून जाते व बोलल्याप्रमाणें कमलपत्रें आणलेलीं तिच्या हृदयावर ठेवते व कमळाच्या देंठ्यांची वलयें करून तिच्या हातांत घालते आणि उरलेल्यांची शय्या करून तीवर तिला निजविते. )

**सागरिका:**—बाई सुसंगते, हीं कमलिणीचीं पानें माझ्या अंगावरून काढून टाक कशी, आणि हीं कमलांच्या देंठांचीं कंकण तरी कशाला पाहिजेत? यांनीं कांहीं व्हावयाचं नाहीं. उगीच तूं आपल्याला त्रास कां करून घेतेस?

**पद**—"मजवरी हें आलें संकट कैसें०" या चा०

**दुर्लभ पुरुषीं हें जडलें मन माझें ॥ सखये कां ऐसें ॥ जडलें० ॥ धृ० ॥ लज्जेनें मी व्याकुळ होतें, नच मन्मानस त्यांना कळलें ॥ दुर्लभ० ॥ १ ॥ मरणाविण आतां ॥ पाहतां ॥ मज नच जगिं त्राता ॥ पा०॥ नको नको हा जन्म स्त्रियांचा दुःखाकारण हें आज कळलें ॥ दुर्ल० ॥२ ॥**

( पडद्यांत शब्द होतो. )

**श्लोक.**

**तोडोनी स्वर्णदामा निज कपि अरधा भाग घेवोनी गेला ॥ द्वारें ओलांडुनीयां अचपळ पळतो भीति नाहीं**

जयाला ॥ वाजे घंटा तियेचा घण घण घण तों नाद होई भयाण ॥ त्याच्या धाकें भिवोनी नरयुवति पहा धांवती घेति रान ॥ १ ॥

ओंवी.

अश्वपाल ही धांवती मागें ॥ हातीं न लागे पाहती रागें ॥
हयशाळेंतूनि सुटला वेगें ॥ राजमंदिरीं निघाला ॥

"श्लोक" (पृथ्वीछंद.)

भयें पळति टाकुनी विनय षंढ सारे किती ॥
खुजे शिरति कंचुकामधिं सुकंचुकीच्या किती ॥
किरात करिती कृती स्वकुलयोग्य लोकीं तशी ॥
भयें चुकवुनी किती पळति कुब्ज उंटें जशीं ॥ १ ॥

**सुसंगताः**—(ऐकून व सागरिकेचा हात धरून) अग ऊठ ऊठ लौकर; हा पहा तो दुष्ट वानर इकडेच येत आहे!

**सागरिकाः**—(घाबरून.) अगाई! काय ग बाई करावं आतां?

**सुसंगताः**—या ताडवृक्षाच्या गर्द अंधकारांत आपण लपून राहूंया. जाईल तो मेला या वाटेनं.

(असें बोलून लपल्यासारखें करितात.)

**सागरिकाः**—सुसंगते, काय ग? तो चित्रफलक तिथेंच टाकून आलीस! तो जर कोणाच्या हातीं लागला तर पुढ कसं होईल?

**सुसंगताः**—पुरेत बाई तुझे विचार. अजून त्या चित्राच्या फळीकडेच तुझं लक्ष्य लागलेलं आहे. यथेच्छ दहीं भात खाऊन मस्त झालेला हा दुष्ट वानर इकडेच येत आहे. त्याला पाहून ती चतुर मैनाही उडून गेली. तर आधीं तिच्या पाठीस लागलं पाहिजे. नाहींतर ती तुझ्या व माझ्या बोलण्यांतील कांहीं दुसऱ्या जवळही सांगेल. (असें बोलून दोघी मैनेच्या मागें लागतात.)

(पडद्यांत.) "आश्चर्य! आश्चर्य!! अहो मोठेंच आश्चर्य!!!"

**सागरिकाः**—गडे तो मेला वानर इकडेच येत आहेसे वाटतं.

**सुसंगताः**—अग मित्रे, उगीच घाबरी होऊं नको. हे माणसा-

च्या तोंडचे शब्द आहेत. बहुतकरून हा महाराजांचा खेळगडी आर्य वसंतक इकडेच येत आहे.

**वसंतकः**—( प्रवेश करून ) आश्चर्य! आश्चर्य!! अहो मोठेंच आश्चर्य!!! वाहवा! वाहवा! शाबास, श्रीखंडदासा; शाबास विद्या असली तर अशी असावी! तूं मोठा धार्मिक खरा!

**सागरिकाः**—( सस्पृह त्याच्याकडे पाहून ) गडे, या मूर्तीकडे एक वेळ पहा तरी!

**सुसंगताः**—त्या सोंगाला काय पहात बसली आहेस? मैना फार लांबली असेल; तर लौकर तिच्या मागं लागून तिला धरिली पाहिजे. ( जातात. )

**वसंतकः**—( पुढें येऊन पूर्वोक्त बोलल्यावर ) शाबास श्रीखंडदासा! तूं दिलेला तो मसाला घातला मात्र, तो ही नवमालिका सदा प्रफुल्लित अशा फुलांच्या झुबक्यांनीं सुशोभित होत्साती देवीनें आपलीशी म्हटलेली जी माधवीलता, तिला जणूं हंसतच आहे असें दिसतें. ( पाहून ) हा माझा प्रियमित्र इकडेच येत आहे; तर हें वर्तमान त्यालाही सांगतों, म्हणजे माझ्याप्रमाणें तोही आनंदित होईल.

**राजाः**—( प्रवेश करून )

पद—"बलसागर तुह्मी वीर०" या चा०

**कामव्यथेनें पीडित तरुणी दिसत असे जैसी ॥**
**त्याचपरी ही उपवन लतिका भासतसे मजसी ॥**
**पुष्पभरानें पांडुरवर्णा ही जाशि ती हि तशी ॥**
**जृंभायुत या दोघींचीही रीति असे कैसी ॥**
**मारुतयोगें क्षणोक्षणींहि दिसताहे जैशी ॥**
**श्वासोच्छ्वासचि सोडित आहे पथिका युवति जशी ॥१॥**

आतां मजवर अनुरक्त झालेल्या सकाम स्त्रीप्रमाणें दिसणाऱ्या या वेलीस दाखवून आज मी खरोखरच राणीचें तोंड रागानें लाल करून सोडीन.



**वसंतकः**—( राजाजवळ येऊन ) मित्रा तुझा जयजयकार असो! तूं मोठ्या नशीबाचा खरा! त्या धार्मिक श्रीखंडदासानें दिलेला मसाला घालतांक्षणींच तुझी नवमल्लिका प्रफुल्लित झुबक्यांनीं त्या वृक्षाला सुशोभित करून देवीनें आपलीशी म्हटलेली माधवीलता तिला जणुं हंसतच आहे कीं काय? असें दिसतें.

**राजाः**—मित्रा, यांत काय संशय? अरे मणिमंत्रौषधीचा प्रभावच विलक्षण आहे! पहा—

पद—"सुवर्णकेतकी परि जो दिसतो॰" या चालीवर.

**श्रीविष्णूच्या कंठीं आहे कौस्तुभ नामक मणि म्हणुनी ॥**
**घातक शस्त्रास्त्रें न बाधती प्रेरियलीं जरि दैत्यांनीं ॥**
**इंद्रजितानें सौमित्रासह वानर वधिले रणांगणीं ॥**
**पुन्हां उठविले द्रोणनगींची औषधि तेथें आणोनी ॥**
**पाताळाप्रति गेले फणिही अवनि पीडितां मंत्रांनीं ॥**
**अतर्क्य आहे प्रभाव यांचा काय कथूं तुज या वदनीं ॥१॥**

असो. आतां तिकडचा मार्ग दाखीव; म्हणजे त्या लतेला पाहून डोळ्यांचें तरी सार्थक करून घेऊं.

**वसंतकः**—( डौलानें ) हा मार्ग. असें असें यावें महाराज.

**राजाः**—तूं चल पुढें. ( दोघेही चालूं लागतात. )

**वसंतकः**—( ऐकिलेंसें करून घाबरतो व राजास मिठी मारून ) मि-मि-मि-मित्रा, च-च-च-चल, मागें पळून जाऊं या.

**राजाः**—अरे कां? असें झालें तरी काय तुला घाबरायाला?

**वसंतकः**—ह्या बकुळीच्या झाडावर बाबा कोणी भू-भू-भूत आहे खचित.

**राजाः**—हा मूर्खा येथें कसलीं भुतें घेऊन बसला आहेस? चल, हो बेधडक पुढें, भित्रा कोठचा!

**वसंतकः**—माझें बोलणें तुला खरें वाटत नसेल, तर तूंच हो पुढें आणि ऐक, म्हणजे तुझीही चांगल्या प्रकारें खात्री होईल.

**राजा**—( पुढें होऊन ऐकत उभा राहतो. ) "वृक्षावरून शब्द",

## दिंडी.

बोल निर्मळ हे स्पष्ट येति कानीं ॥
स्त्रीत्व दाविती जे मधुरता वरोनी ॥
अल्पशक्तीस्तव हळुच करी गाना ॥
मला वाटे ही असे खचित मैना ॥ १ ॥

(वर न्याहाळून पाहून हर्षानें) वेडा रे वेडा! अरे खरोखरिच ही मैना!

**वसंतकः**—(वर पाहून) खरेंच कारे ही मैना!

**राजाः**—होय बाबा, मैनाच बरें.

**वसंतकः**—मित्रा, एकूण तूं भित्रा खरा. मैनेला भूत किंरे समजत होतास!

**राजाः**—मूर्खा, समजत होतास तूं आणि आतां माझ्यावर घालतोस काय?

**वसंतकः**—मित्रा, असें आहे तर आतां मला प्रतिबंध मात्र करूं नकोस, ह्मणजे दाखवितों तिला कसें आहे तें. (रागानें दांडकें वर करून) अगे रांडे मैने, मला तूंच भिववीत होतीस नाहीं? हा पाहिलास माझा दांडका! दुष्ट जनांच्या हृदयाप्रमाणें कसा वांकडा आहे तो; यानें तुला झोडपून या बकुलवृक्षावरून पिकलेल्या कवठाप्रमाणें टपदिशीं खालीं पाडतों. (असें बोलून मारावयास प्रवृत्त होतो.)

**राजाः**—(त्याचें निवारण करून) मूर्खा, आधीं ती मधुर शब्दांनीं काय बोलते तें ऐक.

**वसंतकः**—(ऐकिलेंसें करून) या ब्राह्मणास भोजन दे, भोजन दे, असेंच ही सांगत आहे.

**राजाः**—तुझ्या सगळ्या बोलण्याचें पर्यवसान भोजनावर यावयाचें. अरे नीट ऐकून काय बोलते तें मला सांग.

**वसंतकः**—(पुनः ऐकिलेंसें करून.) मित्रा, ही असें बोलतेः—“गडे, तूं येथें माझें चित्र कां काढलेंस? शाहणींस दिसतेस मोठी!”

"अग, तूं उगीच माझ्यावर कां रागावतेस, जसें तूं कामदेवाचें चित्र काढलेंस, तसेंच मी रतीचें चित्र काढलें. बरें, पण, आतां किती तरी माझ्याजवळ छपविशील? उगीच आढे वेढे घेऊं नकोस, जें असेल तें सर्व खरें सांग, म्हणजे पुढची तजवीज करण्यास ठीक पडेल."

**राजाः**—मित्रा, या बोलण्यावरून मला असें वाटतें की,

**पद**—"चित्तचोर तोचि रुचिर०" ही चाल.

**कोणि तरी कामिनिनें अधिर होउनी ॥**
**प्रियास सुचिर प्रेमभरें चित्रि काढुनी ॥ धृ० ॥**
**कामदेव हाच असें मीष सांगुनी ॥**
**सखिजनांस ठकवि परी लबाडि जाणुनी ॥**
**त्याच पलकीं निज कौशल्यास खर्चुनी ॥**
**तिचेंच चित्र काढियलें श्रेष्ठ रतिहुनी ॥ १ ॥**

**वसंतकः**—( चुटकी वाजवून ) होयरे होय मित्रा, तूं म्हणतोस तसें जुळतें खरें.

**राजाः**—अरे, गप्प रहा, ती मैना पुनः कांहीं बोलत आहे. ( दोघे ऐकूं लागतात. )

**वसंतकः**—प्रिय मित्रा, पुनः ही असें म्हणते—"सखे पुरे आतां उगीच लाजूं नकोस. असल्या उत्तम कन्यारत्नाचा तशा योग्य वराच्या ठिकाणी अभिलाष होणें, हें अगदीं स्वाभाविक आहे."

**राजाः**—यावर तुझा तर्क काय बरें चालतो?

**वसंतकः**—मित्रा, तूं आतां आपल्या पांडित्याची घमेंडि बाळगूं नकोस. ज्या कन्येचें सखीनें चित्र काढलें आहे ती अति सुंदर असावी.

**राजाः**—मित्रा, असें आहे तर आतां लक्ष्य लाऊन हिचें बोलणें ऐकलेंच पाहिजे.

**वसंतकः**—( ऐकून ) गड्या, ही रांडेची मैना आतां तर चतुर्वेदी ब्राह्मणासारखी वेदांतील ऋचाकिरे पढूं लागली!

**राजाः**—( हंसून ) मित्रा, तुझ्यासारख्या महावैदिकब्राह्मणावांचून ही ऋचा आहे असें कोणाला समजणार आहे बरें?

**वसंतकः**—काय ह्मणतोस? ही ऋचा नव्हे? मग रे काय आहे तर?

**राजाः**—अरे तें पद आहे!

**वसंतकः**—पद तें काय बाबा! बरें तें असो. ती ह्यांत ह्मणते तरी काय?

**राजाः**—मित्रा,

**पद**—"नृपाल कोप शांतवीन मी कशी," या चा०

**काम व्यथित युवति असे ही खरी ॥**
**अधीर कांत भेटिला निजांतरी ॥**
**परि न भेट होय ह्मणुनि कष्टि होवुनी ॥**
**वदे, असे, सखीप्रती, नको हा प्राण गे ॥**
**मजसि क्षणभरी ॥ १ ॥**

**वसंतकः**—( मोठ्यानें हंसून ) अरे, एवढा द्राविडी प्राणायाम कशाला? "प्रीतिपात्र न मिळाल्यामुळें" असें सरळच कां ह्मणेसना! कारण-मदनाचे मिषानें तुझ्यावांचून आणखी दुसऱ्या कोणाचें चित्र काढून फसवितां येणार आहे? ( असें बोलतांना टाळी देऊन मोठ्यानें हंसतो. )

**राजाः**—( वर पाहून ) हा मूर्खा! केवळ्यानें हंसलास हा! ती मैना त्या भीतीनें उडून कोणीकडे गेली कोण जाणें.

**वसंतकः**—( पाहून ) मित्रा, भलतीच शंका घेऊं नको. ती कांहीं कोठें दूर गेली नाहीं. कदलीगृहांतच गेली आहे. तर चल, आपणही तिकडेच जाऊं. ( जाऊं लागतात. )

**राजाः**—मित्रा, मी त्या मैनेच्या तोंडांतले शब्द ऐकण्यास इतका आतूर झालों आहे याचें कारण तुला माहित नाहीं—

**पद**—"फुलें वेलीचीं" या चा०

**मदन करी मार ॥ मदन क० ॥ सुकुमार अशी जी नार ॥ मद० ॥ धृ० ॥ अंतरिं व्याकुळ होउनि भारी ॥ कथिते हितगुज प्रेमें सुंदरी ॥ जिवलग मैत्रिणीस, तें जरी ॥ ऐके नरवीर ॥ तो धन्य असे जगिं फार ॥ मदन क०॥१॥**

वसंतकः—हेंच तें कदलीगृह. मित्रा, मरो ती रांडलेक मैना! त्या उन्हाच्या तापानें तुला फार श्रम झाले आहेत; तर मलयाचलाच्या सुगंधवाऱ्यानें हालणाऱ्या बालकदलीच्या शीतलछायेखालीं असलेल्या या शीलातलावर बसून क्षणभर विश्रांति घेऊं या.

राजाः—तुझ्या इच्छेप्रमाणें कां होईना? (बसतात.)

वसंतकः—( बाजूला पाहून ) मित्रा, त्या दुष्ट वानरानें उघडलेला हा त्या मैनेचा पिंजरा असावा.

राजाः – पहा पहा बरें तोच कायतो.

वसंतकः—आज्ञा महाराज. ( जवळ जाऊन व पाहून ) अरे हा येथें चित्रफलक! आपण घ्यावा तर. ( घेऊन निरखून पाहिल्यावर हर्षानें ) मित्रा, तूं मोठा दैवशाली खरा!

राजाः—अरे असें काय आहे तें?

वसंतकः—कां? मी म्हटलें नव्हतें मघाशीं कीं–"मदनाचे मिषानें तुझ्यावांचून आणखी दुसऱ्या कोणाचें चित्र काढून फसवितां येणार आहे!" तुझेंच चित्र हें.

राजाः—(आतुरपणानें हात पुढें करून) गड्या मला दाखीव तरी!

वसंतकः—अंहं, मी नाहीं दाखविणार. कारण त्या कन्येचेंही येथें चित्र काढलेलें आहे; तर असलें कन्यारत्न कोणी बक्षीस घेतल्याशिवाय दाखवील कां?

राजाः—अरे हें घे कडें तुला बक्षीस! ( कडें काढून देतो व चित्रफलक त्याच्या हातांतून हिसकावून घेऊन व पाहून विस्मयानें ) मित्रा, पहा पहा!

पद्–"बासरी बजाइ०" या चालीवर.

**मानसांत राजहंसी कोण ही प्रवेश करी॥ आपला विशेष पक्षपात दावि मजवरी ॥ धृ० ॥ करांत कमल खेळणें सुरम्य हें किती तरी ॥ मन्मनास मधुकरसम करित लुब्ध सुंदरी ॥ शशिवदना निर्मुनियां धात्यानें क्षणांतरीं॥ आसनास्त सांवरिलें असेल भिजुनि अंतरीं ॥ १ ॥**

( इतक्यांत सुसंगता व सागरिका त्याच ठिकाणीं येतात. )

**सुसंगताः**—काय करावं बाई? शेवटीं ती सारिका आपल्याला मिळाली नाहींच. तर आतां कदलीगृहांत चित्रफलक आहे, तो तरी घेऊन जाऊं या.

**सागरिकाः**—बरं तर, चल जाऊं तिकडे. ( पुढें जातात. )

**वसंतकः**—मित्रा, ही खालीं तोंड केलेली अशी कां काढली आहे बरें?

**सुसंगताः**—गडे, हा वसंतक येथें बोलतो आहे यावरून महाराजही येथेंच असतील असं वाटतं. तर आपण या वेलीच्या आड लपून ते काय बोलतात तें ऐकूं या. ( वेलीच्या आड रहातात. )

**राजाः**—मित्रा, पहा पहा! ( 'मानसांत राजहंसी' हें पूर्वोक्त पद पुनः ह्मणतो. )

**सुसंगताः**—सखे, हा तुझा हृदयवल्लभ तुझ्याच सौंदर्याचें वर्णन करीत आहे.

**सागरिकाः**—तूं बाई उगीच थट्टा करून मला खजील कां करितेस.

**वसंतकः**—( राजास हालवून ) अहो महाराज! हिनें मान खालीं कां घातली आहे तें सांगा पाहूं.

**राजाः**—अरे वरचेवर काय विचारतोस? काय सांगावयाचें तें त्या सारिकेनें सांगितलेंच आहे.

**सुसंगताः**—गडे, पाहिलेंसना! अखेरीस त्या सारिकेनें आपलें बुद्धिकौशल्य ह्यांना दाखविलें.

**वसंतकः**—मित्रा, खरेंच सांग. ही तुझ्या डोळ्यांला आनंद देते कीं नाहीं रे.

**सागरिकाः**—अरेरे!

पद—"तव मानस कैसें काय०" या चालीवर.

**नकळे नरपती हा आतां वदतो काय ॥ ध्रु० ॥**
**चिंतेनें मम काय जळतो किती हाय हाय ॥**
**श्रीजगदंबे आई भवानी तारक तूं मज माय गे ॥**
**अन्य न कोणी ऐसें जाणुनी नमिते मी तव पाय ॥**
**होउनी दीनाशि गाय ॥ नक० ॥ १ ॥**

**राजाः**—गड्या, आनंद देते कीं नाहीं हें काय विचारतोस ?

**पद**—"कौं सोतनके डिंगबिलम०" या चालीवर.

**किती मधुर तरी हें स्वरूप असे धन्य खरोखरी ॥**
**मदीय सुंदर हृदयीं ठसे दृढ हि सुंदरी ॥ किती० ॥धृ०॥**
**प्रथम दृष्टी मृदुल शरिरीं ॥ लोलुप होतसे सु उरुवरी ॥**
**न काढवे मज पळही भरी ॥ तेथुनि लौकरी ॥ कि० ॥ १ ॥**
**नितंबभागीं भ्रमित झाली ॥ उंचनीच स्थळीं हिंडुनी खुळी ॥ स्तन प्रदेशीं चढुन गेली ॥ श्रमित होउनी तृषा पावली ॥ तेथेंच राहिली वाट बघत ॥ नेत्रबिंदुजलश्रावहि होत ॥ ह्मणुनि साकांक्ष वरचेवरी ॥ पहात किती तरी ॥ ॥ किती० ॥ २ ॥**

**सुसंगताः**—सखे, ऐकिलेंसना तूं हें.

**सागरिकाः**—( हंसून ) अग, तूंच ऐक. हें तुझें–चित्र काढणारणीचं वर्णन चाललं आहे.

**वसंतकः**—( चित्रफलक निरखून पाहून ) मित्रा, अशासारख्या सुंदर स्त्रियांना सुद्धां तुझा समागम फार प्रिय वाटतो ! आणि तुझ्याकडे पहावें तर तूं स्वतः विषयीं फार उदासीन दिसतोस. कारण हें इकडे तिणें काढलेलें तुझें चित्र असून तिकडे तूं पहात देखील नाहींस !

**राजाः**—अरे, हिचें चित्र पाहाण्यांत मन गढून गेल्यामुळें मला दुसरीकडचें भानच राहिलें नाहीं ! ( निरखून पाहून ) गड्या अशा कन्येनें स्वतः हें माझें चित्र काढलेलें पाहून मला जो आनंद होत आहे तो सांगतांही येत नाहीं.

**पद**–"शिरीं गंगा धरी०" या चालीवर.

**प्रियेनें त्या मदीय चित्रा ॥ काढियेलें स्वहस्तानें ॥**
**अश्रुबिंदु ढाळियेले ॥ लिहितांनां किती तीनें ॥**
**शरिरीं ते दिसती माझ्या ॥ घर्मांचेच कण साचे ॥**
**जाहलों मीं जगिं धन्य ॥ बघुनि चित्रासि नेत्रानें ॥ १ ॥**

**सागरिकाः**—( आपल्याशीं )

पद-"चाल-सदर."

धरीं आतां धीर स्वांता ॥ सगुणवंता त्यजुनि भिरुता ॥
असे तूझी जशी इच्छा ॥ तशी दिसते ईशसत्ता ॥
जरी आहे मनोराज्यीं ॥ तरी आला रुचिरपंथा ॥
करिल तुजला जगिं धन्य ॥ असें गमतें सुगुणवंता ॥१॥

**सुसंगताः**—सखे, तूं हें ऐकिलेंस ना ?

**सागरिकाः**—बाई, तूंच तें ऐक. तुझ्याच कौशल्याचें वर्णन चाललें आहे.

**वसंतकः**—मित्रा, हें पहा, तिनें सरोवरांतल्या कोमल अशा कमलिनीच्या देंठांनीं केलेलें मदनावस्थेचें सूचक असें कांहीं दिसत आहे.

**राजाः**—( पाहून ) गड्या, चांगलें पाहिलेंस. हें त्या कृशांगीचेंच शयनस्थान असावें.

पद-'अरे मुवे छोड मुझे०' या चा०

मृदुल अशा कमलदलांची ही शेज या स्थलीं ॥
पहा मन्मित्रा, त्या कामिनीची ॥ धृ० ॥
दाखवी अनंगव्यथा, स्पष्ट तिला जाहली ॥ १ ॥
पीनस्तनानें जघनहि संगें ॥
दोन्हींही स्थानिं पहा दिसे किती करपली ॥ २ ॥
बारिक कटिच्या मध्यें जी राहिली ॥
स्पर्शावीण तीच दिसे हिरवि गार चांगली ॥ ३ ॥
चैन पडेना यास्तव लोळुनी ॥
शिथिल तर भुजवल्ली प्रसंगेंच विखुरली ॥ ४ ॥
आणखी—

साकी.

मदनाग्नीच्या संतापानें शुष्क असे झालेले ॥
तिच्या स्तनांचे मंडल सम वण दिसति इथें उठलेले॥
स्तन विस्तार तिचा ॥ दाविति जणुं हे मज साचा ॥१॥

**वसंतकः**—(तेथेंच पडलेला कमलाचा देंठ हातीं धेऊन) मित्रा,

हा पहा ! तिच्याच पुष्ट स्तनांच्या घर्षणानें कोमेजलेला कोमल अशा कमलांच्या देंठ्यांचा हार आहे.

**राजाः**—( तो हातांत घेऊन उरास लावून ) अहाहा ! अरे जडप्रकृते,

पद—"नरमांसखंड शोणिता०" या चा०

**तिच्या स्तनांमध्यें न स्थान प्राप्त रे तुला ॥**
**उगीच कां सुकूनि जासि सांग हें मला ॥ धृ० ॥**
**सघनता कुचाचि तिच्या असे किं यातला ॥**
**बारिकही तुझा न तंतु जाण चांगला ॥**
**मग असारे लठ्ठ कसा राहसि त्या स्थला ॥**
**विचार सोडुनी कसारे होसि तूं खुळा ॥१॥**

**सुसंगताः**—अरेरे, महाराजांना सागरिकेवर अतिशय अनुराग उत्पन्न झाल्यामुळें त्यांचें अंतःकरण अगदीं उडून गेल्यासारखें झालें आहे; व ह्मणूनच ते या वेळीं भलभलतें बडबडत आहेत. तर आतां अधिक वेळ उपेक्षा करणें चांगलें नाहीं. कसेंही असो, महाराजांच्या मनाला विश्रांति होईल असें कांहीं तरी केलें पाहिजे. ( उघड सागरिकेस ) सखे, ज्याच्याकरितां तूं आलीस, तो तुझ्या पुढें उभाच आहे. त्याच्याकडे एकदां पहा तरी.

**सागरिकाः**—( बाह्यात्कारीं तिरस्कार दाखवून ) मी कोणाकरितां आलें आहें? आणि येथें आहे तरी कोण?

**सुसंगताः**—( हंसून ) अग, उगीच भलतीच शंका घेऊं नकोस. तूं चित्रफलकाकरितां आली नव्हतीस काय? घे तर तो आतां.

**सागरिकाः**—( रागाऊन ) मला बाई तुझीं असलीं बोलणीं नाहीं समजत. मी आपली जातें दुसरीकडे.

**सुसंगताः**—( तिला धरून ) अग, रागावणारे बाई, जरा थांब घटकाभर; तोंवर मी या कदलीगृहांतून चित्रफलक घेऊन येतें.

**सागरिकाः**—जा तर घेऊन ये लौकर.

**सुसंगताः**—लौकर येतें बरें, भिऊं नकोस. (कदलीगृहांत जाते.)

**वसंतकः**—( सुसंगतेस पाहून ) मित्रा, झांक झांक लौकर चित्रफलक. ही पहा राणीची दासी सुसंगता इकडेच येत आहे. ही पाहील तर हें वर्तमान तुझ्या त्या शिरजोर बायकोला सांगेल.

**राजाः**—( अंगावरील वस्त्रानें चित्रफलक झांकतो. )

**सुसंगताः**—( जवळ जाऊन ) महाराजांचा जयजयकार असो.

**राजाः**—सुसंगते, बरी आलीस, बैस येथें.

**सुसंगताः**—( बसते. )

**राजाः**—सुसंगते, मी येथेंच आहे, हें कसेंगे तुला कळलें?

**सुसंगताः**—( हंसून ) केवळ महाराजच येथें आहेत हेंच समजलें, असें नाहीं; चित्रफलकासुद्धां झाडून सारें समजलें आहे. आणि तें आतां बाईसाहेबांनाही कळविलें पाहिजे. ( असें बोलून जावयास लागते. )

**वसंतकः**—( राजास एकीकडे ) गड्या, ही बोलल्याप्रमाणें करील. कारण ही बटकीची पोर फार चोंबडी आहे. तर अगोदर हिला खुष कर बरें.

**राजाः**—( सुसंगतेस अडवून ) अग, हा घटकाभर विनोद आहे. तूं कांहीं तरी भलतेंच सांगून राणीला विनाकारण दुःख देऊं नकोस हो. हें घे तुला इनाम. ( आपल्या अंगावरचा दागिना देतो. )

**सुसंगताः**—महाराज, हे अलंकार मला कशाला हवेत? बाई-साहेबांच्या कृपेनें मी पुष्कळ भोगलं आहे. आतां प्रसन्नच झालां आहांत तर माझें चित्र येथें कां काढलेंस म्हणून माझी प्रियसखी सागरिका माझ्यावर रागाऊन बसली आहे. तरी महाराजांनीं स्वतः तिच्या हाताला धरून तिला खुष करावें.

**राजाः**—( गडबडीनें उठून ) अग, कोठें कोठें आहे ती? दाखीव दाखीव लौकर.

**सुसंगताः**—ह्या केळीच्या बेटाआड लपून राहिली आहे.

**वसंतकः**—मित्रा, दे पाहूं तो चित्रफलक, याचेंही तेथें कांहीं काम पडेल.

**सुसंगताः**—असें असें यावें महाराज.

( कदलीगृहाच्या बाहेर पडतात. )

**सागरिकाः**—( राजास पाहून हर्ष, भय व कंपयुक्त मनांत ) अगबाई, यांनां पाहून—

पद–"क्या सुहाये रंगे जो मोरा०" या चा०

**मन हें माझें बहु घाबरलें ॥ हर्ष युक्त सुप्रेमें डोले ॥धृ०॥ भीतीनें तनु कंपित झाली ॥ जाण्यालाही पद नच हाले ॥ मन० ॥ १ ॥ मनमोहन या रूपा पाहुनी ॥ तम मन धन ही विसरुनि गेलें ॥ मन० ॥ २ ॥**

**वसंतकः**—( सागरिकेस पाहून ) अरे वाहवा वाहवा! असलें कन्यारत्न मनुष्यलोकांत तर दिसावयाचें नाहींच. हिला उत्पन्न करून ब्रह्मदेवाला देखील आपल्या कौशल्याचा विस्मय वाटला असेल!

**राजाः**—गड्या, तूं अगदीं खरें बोललास.

पद–"गुरु दत्तनिरंजन०" या चा०

**त्रिभुवनांत सुंदर अबला ॥ रचुनियां धन्य विधि झाला ॥धृ०॥ स्वासन पद्माधिक तेजोयुत निज नेत्रें पृथु करूनी॥ चहूं मुखानें "वाहवा वाहवा" असेल ऐसें वदला ॥ त्रि० ॥ ॥ १ ॥ विस्मित होऊनी आनंदोदधि उचंबळोनीप्रेमें ॥ सकळ मस्तकें डोलउनी मग असेल निजमनीं धाला ॥२॥**

**सागरिकाः**—( रागानें सुसंगतेकडे पाहून ) सुसंगते, तूं ह्याचना चित्रफलक आणिलास? बरं केलंस बाई. ( असें ह्मणून रागानें जाऊं लागते. )

**राजाः**—( तिला अडवून ) हे भामिनी—

पद–"रम्यविमानीं नृपा बैसुनी०" ही चाल.

**कोपयुक्त अंतरीं ॥ सुंदरी ॥ होउनि प्रेरिसी दृष्टी जरी तरी ॥ स्निग्धचि मुळची खरी ॥ रुक्ष न तिळहीभरी ॥ ॥ खरोखरी ॥ तद्रुप पाहुनी मार मारि उरीं ॥ माझ्या तीक्ष्ण सुरी ॥ १ ॥ मंदगती तूं धरी ॥ क्षणभरी ॥ धांवुं नकोगे अडखळतांनां नितंब खेद बहु करी ॥ २ ॥**

**सुसंगता:**—महाराज, ही फार रागीट आहे. आपण हिचा हात धरून हिला प्रसन्न करून घ्यावें.

**राजा:**—( आनंदानें ) तूं ह्मणतेस तसेंच करितों. ( सागरिकेचा हात धरून स्पर्शसुखानें ) अहाहा! मित्रा.

पद-"रमा करी मम मनिं०" ही चाल.

**शीतल सखिकर हा मजला ॥ तृशित चातका स्वाती घनजल तोषद तैसा मज झाला ॥ धृ० ॥ कामाग्नीचा विझविल भडका ॥ सुंदरी ॥ रति रंगवुनी ॥ मज दंग मनीं ॥ करितांच जनीं ॥ सत्य कथितसें धन्य कोणी नच मजसम त्रयभुवनीं उरला ॥ १ ॥**

**वसंतक:**—मित्रा, तुला ही अपूर्व इंदिराच प्राप्त झाली रे.

**राजा:**—गड्या, खरें बोललास.

पद-"नच सुंदरी करूं कोपा०" ही चाल.

**सुंदरी ही मज भासे ॥ इंदिराच साच असे ॥**
**त्रयभुवना भूषण हें शुद्ध धवल विलसे ॥ धृ० ॥**
**पारिजात वृक्षाचा ॥ मृदु अंकुर हा साचा ॥**
**कर गमतो कामिनिचा ॥ अनृत नच ही वाचा ॥**
**घर्ममिषें ह्मणुनि स्राव अमृत हें वाहतसे ॥ सुं० ॥१॥**

**सुसंगता:**—गडे, तूं अगदीं आडदांड आहेस. महाराजांनीं स्वतः तुझा हात धरला असतांही अजून राग सोडीत नाहींस ना?

**सागरिका:**—सुसंगते, अजून देखील तुझी ही बडबड पुरी होत नाहीं ना?

**राजा:**—प्रिये सागरिके, अग सखिजनांवर असा राग करणें युक्त नव्हे.

**वसंतक:**—( पुढें होऊन ) अहो छोट्या बाईसाहेब, अशा भुकेल्या भटजींसारख्या उगीच कां रागावतां?

**सुसंगता:**—सखे, तुझ्याशीं बोलायाला बसलें आहे कोण आतां?

**राजा:**—अग कोपिष्टे, बरोबरीच्या सखीवर असा कोप करणें योग्य नाहीं.

**वसंतकः**—ही येथें खरोखर दुसरी देवी वासवदत्ताच प्राप्त झाली.

**राजाः**—( चकित होऊन एकदम सागरिकेचा हात सोडतो. )

**सागरिकाः**—( घाबरून ) सुसंगते, आतांग कसं?

पद–"कंथबिन रही अकेली०" या चा०

**काय करूं नच भान ॥ सखेग काय० ॥**
**जाउं पाहती प्राण सखे० ॥ धृ० ॥**
**भीतीनें हें हृदय थरथरां कांपतसे किति आज ॥**
**घर्मानें तनु डवडघली ही रक्षि अतां मम लाज ॥**
**सखे० ॥ १ ॥**

**सुसंगताः**—( तिचा हात धरून ) अग भितेस कां? चल या ताडवृक्षाच्या आड होऊन निघून जाऊं.

**सागरिकाः**—( जातां जातां )

पद—"जल खानेका दरोगा पकड भाईरे," या चालीवर.

**काय भूलहि पाडिलि प्रबल विधिनें ॥ काय० ॥ धृ० ॥**
**अंकागत प्रिय वस्तु आज मज सहज प्राप्त जाहली ॥**
**परि दुर्दैवें वेळ साधुनि दूर कशि लोटिली ॥**
**केलि शरिराचि होळी निष्ठुर मदनें ॥ काय० ॥ १ ॥**

( जातात. )

**राजाः**—( हिकडे तिकडे पाहून विस्मयानें ) अरे कोठें आहे देवी वासवदत्ता?

**वसंतकः**—मला काय विचारतोस. ती कोठें आहे तें मला काय ठाऊक? सागरिकेच्या रागीट स्वभावावरून ही दुसरी देवी वासवदत्ताच आहे असें मी सहज म्हटलें.

**राजाः**—हा मूर्खा!

पद—"चित्त चोर तोचि रुचिर०" या चालीवर.

**महा यत्न करुनि प्रिया लाभली करीं ॥**
**परि न तिला प्रेमभरें पाहिली पुरी ॥**
**सौख्यखनी रत्नावलि सुमति सुंदरी ॥**
**न घालितां गळ्यांत तिला फेंकिली दुरी ॥ १ ॥**

[ इतक्यांत वासवदत्ता व कांचनमाला येतात. ]

**वासवदत्ताः**—कांचनमाले, प्राणनाथानें आपलीशी ह्मटलेली ती नवमालिका, अजून किती तरी दूर आहे गे?

**कांचनमालाः**—बाईसाहेब, या कदलीगृहाच्या पलीकडे जवळच आहे. असं असं यावं. ( पुढें जातात. )

**राजाः**—गड्या, त्या प्रियतमेला आतां कोठें बरें पाहूं?

**कांचनमालाः**—बाईसाहेब, महाराजांचा शब्द जवळच ऐकूं आला; यावरून असं वाटतं कीं सरकारस्वारी आपलीच वाट पहात बसली आहे. तर लौकर तेथें चलावं.

**वासवदत्ताः**—( राजाजवळ जाऊन ) प्राणनाथाचा जयजयकार असो.

**राजाः**—( एकीकडे, वसंतकास ) लपीव, लपीव तो चित्रफलक.

**वसंतकः**—( कांखेंत लपवितो. )

**वासवदत्ताः**—प्राणनाथ, आलीं का तुमच्या नवमालिकेला फुलं?

**राजाः**—हो, आह्मी तिला पाहण्याकरितां केव्हांचे येथें येऊन बसलों आहों; पण तुला यावयास वेळ लागला ह्मणून अद्याप तिकडे गेलों नाहीं. तर चल आतां बरोबर जाऊन पाहूं.

**वासवदत्ताः**—( राजाकडे निरखून पाहून )

**पद—"रुचती कां तीर्थयात्रा०" ही चाल.**

**तव नाथा वदन भासे कमलचि हें विकसलें ॥**
**पाहुनियां भ्रमरि ही मी सुप्रेमें लुब्धलें ॥**
**नलगे हो जावयासी मन येथें शांतलें ॥**
**सुकुसुमिता मालती हें आमोदानें कळे ॥ १ ॥**

**वसंतकः**—राणीसाहेब असें आहे तर आह्मी तुह्मांस जिंकिलें? ( असें ह्मणून बाहु वर करून नाचूं लागतो, तेव्हां चित्रफलक खालीं पडतो. )

**राजाः**—( एकीकडे खेद पावून वसंतकास चित्रपट् उचलून घ्यावयास खुणावितो. )

**वसंतकः**—( राजाकडे पाहून ) मित्रा, रागावूं नकोस. मी तो झांकून ठेवितों.

**कांचनमालाः**—( चटदिशीं तो फलक घेऊन ) बाईसाहेब, पहा, पहा, ह्या फलकावर काय काढलेलं आहे तें ?

**वासवदत्ताः**—( निरखून पाहून आपल्याशीं ) हे तर प्राणनाथ, आणि ही शेजारीं सागरिका आहे! बरं. ( उघड ) महाराज, काय आहे हें?

**राजाः**—( खिन्न होऊन वसंतकास ) मित्रा, आतां काय बोलूं मी ?

**वसंतकः**—( राजास एकीकडे ) मित्रा, तूं भिऊं नकोस! मी देतों हिला उत्तर. ( वासवदत्तेस ) बाईसाहेब? भलतेंच मनांत आणूं नका. मी महाराजांनां बोलतां बोलतां असें ह्मटलें कीं, स्वतःचें चित्र स्वतःला कधीं काढतां यावयाचें नाहीं. यावरून माझ्या मित्रानें हें आपलें कौशल्य दाखविलें आहे.

**राजाः**—हो, हो, प्रिये, वसंतक ह्मणतो हेंच खरें आहे.

**वासवदत्ताः**—( फलक दाखवून ) प्राणनाथ, आणि ही हो जवळ कोण? हें आर्यवसंतकाचें शहाणपण पाघळलं आहे वाटतं ?

**राजाः**—( लाजून हंसत ) प्रिये, भलतीच शंका मनांत आणूं नकोस. हें चित्र केवळ मनःकल्पित काढलेलें आहे. अशी स्त्री मी पूर्वी कधींच पाहिली नव्हती.

**वसंतकः**—( जानवें हातांत धरून ) हो हो! या यज्ञोपवीताची शपथ जर अशासारखी स्त्री आह्मीं पूर्वी पाहिली असेल तर.

**कांचनमालाः**—( एकीकडे वळून ) बाईसाहेब कदाचित् असंही खरं असेल. सहज कोणत्या तरी राजकन्येचं चित्र काढलं असून तें घुणाक्षरन्यायानं सागरिकेसारखं दिसत असेल.

**वासवदत्ताः**—अग तूं आहेस भोळी. तुला या वसंतकाच्या कुटिल भाषणाचा अर्थ समजला नाहीं. ( राजास ) महाराज, हें चित्र पाहून माझ्या कपाळांत तिडीक उठली आहे. तुह्मी खुशाल येथें पाहिजे तें करा. मी जातें. ( जाऊं लागते. )

**राजाः**—( तिचा पदर धरून )

पद.

मत्प्राणप्रिये, काय इथें, सांगुं तुतें उमजेन तें ॥धृ०॥
"देवी तूं प्रसन्न हो" जरि असें वदेन गे ॥
तरि न कोप लवहि तुला; श्रम हे वाउगे? ॥ प्रा० ॥१॥
"पुनरपि न करीन" असें विनवुं तुजप्रती! ॥
तरी मद्दंगिं आज जडे केलि ही कृती ॥ प्रा० ॥ २ ॥
"अपराधी तिळहि तुझा" मी न असे गे ॥
परि हे तुला भासतील बोल वाउगे ॥ प्रा० ॥ ३ ॥

**वासवदत्ताः**—( हळुहळु सविनय पदर ओढीत )

पद–"दारिद्रें जनकाची०" ही चाल.

जाउंद्या आतां मजसि प्रिया येथुनी घरीं ॥ धृ० ॥
शंका अशी भलभलती, आणुं नका निज चित्तीं ॥
सोडि पदर प्राणपती ॥ मदीय झडकरी ॥ जा० ॥ १ ॥

[ दासीसह वासवदत्ता जाते. ]

**वसंतकः**—मित्रा, तूं मोठ्या नशीबाचा बाबा, अरे, ही वासवदत्तारूपी अकालवादलिका बऱ्याच रितीनें टळली.

**राजाः**—छत्! मूर्खा, ती गेली त्याचा तूं संतोष मानतोस काय? अरे,

पद—"जगिं आशेचा पिता असे०" ही चाल.

कुपित होउनी भृकुटि चढविल्या परि न दिसाव्या मजशी ह्मणुनी ॥ अतिशय केलें खालिं वदन रे काय वदुं तुज तीची करणी ॥ धृ० ॥ हृदय भेदिसें हंसली तरि ती नाहींच वदली कठोर वाणी ॥ अंतरंगींच्या दुःखें तीच्या आलें किति नेत्रातें पाणी ॥ तें न दिसावें ह्मणुनि मजकडे पाहिलें नच मुळिं निज नयनांनीं ॥ कोप असा जरि दाखविला तरि विनय हि सोडी नच ती सुगुणी ॥ १ ॥

तर चल देवीला प्रसन्न करण्याकरितां अंतःपुरांत जाऊं.

[ असें ह्मणून जातात. ]

## हा "कदलीगृह" नामक दुसरा अंक झाला.

# अंक तिसरा.

( तदनंतर मदनिका या नांवाची एक दासी येते. )

**मदनिकाः**—( दुसऱ्या कोणाजवळ बोलत आहे असें दाखवून ) अगे कौशांबिके, कांचनमाला राणीसाहेबांच्याजवळ आहे कीं नाहीं, हें तुला ठाऊक आहे का? ( ऐकल्यासारखें करून ) काय ह्मणतेस? "तिला येऊन गेल्यास बराच वेळ झाला" ह्मणून? आतां कुठं बरं मी तिला शोधावं? ( दूरवर पाहिल्यासारखं करून ) वाहवा! कांचनमालाही इकडेच येत आहे. तर आतां मीही तिच्याजवळ जातें. ( असें बोलून पडद्याकडे वळते. )

**कांचनमालाः**—( प्रवेश करून व उसासा टाकून ) शाबास! वसंतका, शाबास! एकूण आज संधिविग्रहादिक मसलतीच्या कामांत प्रधान यौगंधरायणावर तूं कडी बसविलीस खरी. बारे बा.

**मदनिकाः**—( जवळ जाऊन ) सखे, कांचनमाले, आज जी इतकी तूं वसंतकाची स्तुति करितेस तर त्यानं असं केलं तरी काय?

**कांचनमालाः**—मदनिके, तूं कशाला उगीच विचारतेस मजपाशीं? गुप्त रहस्य तुझ्या तोंडीं राहिलं असं आजपर्यंत कधीं तरी झालं आहे का?

**मदनिकाः**—दुसऱ्या कोणाजवळ जर बोलेन, तर बाईसाहेबांच्या पायाची शपथ. आतां तरी तुझी खात्री होईलना? सांग बाई तर काय तें.

**कांचनमालाः**—अग शपथच घेत आहेस तर सांगतें ऐक. आज कीं नाहीं मी राजवाड्यांतून परत येत असतां चित्रशाळेच्या दरवाज्याजवळ त्या वसंतकाचं सुसंगतेशीं बोलणं चाललं होतं तें मी ऐकिलं.

**मदनिकाः**—( कौतुकानें ) अग पण असं तें बोलणं कोणतं?

**कांचनमालाः**—वसंतक ह्मणालाः-" सुसंगते, माझ्या प्रिय

मित्राची प्रकृती ताळ्यावर नसण्याचं कारण सागरिके शिवाय दुसरं कोणतंही नाहीं. तेव्हां तूं याला कांहीं तरी उपाय काढ."

**मदनिकाः**—बरं यावर सुसंगता काय ह्मणाली ?

**कांचनमालाः**—ती ह्मणाली:—"आज तो चित्रफलक पाहून देवीच्या मनांत संशय आला आणि तिनें सागरिकेवर नजर ठेवावी, ह्मणून तिला माझ्या स्वाधीन केलं. ह्या कामांत माझं अंग आहे हें देवीला ठाऊक नाहीं. तिनं सांगितलेलं काम मी विश्वासानं करावं, ह्मणून देवीनं आपल्या अंगावरील अलंकार काढून मला बक्षीस दिले. तर आतां त्याच वस्त्रालंकारांनीं सागरिकेला थेट देवीप्रमाणं सजवितें आणि मी कांचनमालेप्रमाणं हुबेहूब पोषाख करितें नंतर मनुष्यास मनुष्य दिसतं न दिसतं, अशा सायंकालच्या वेळीं मी तिला महाराजांजवळ आणतें. तूंही त्या वेळीं याच ठिकाणीं आमची वाट पहात ऐस. नंतर माधवीलतामंडपांत सागरिकेची व महाराजांची भेट होईल, असा योग जमवून आणूं ह्मणजे झालं."

**मदनिकाः**—युक्ति फार नामी खरी. पण सुसंगते फारच बाई कृतघ्न तूं! आपणांविषयीं राणीसाहेब इतक्या ममताळु असतां त्यांना अशा प्रकारानं फसविण्याची मसलत करतेस औं ?

**कांचनमालाः**—मदनिके, बरं, तूं ग कुणीकड चालली आहेस ?

**मदनिकाः**—बाईसाहेबांनीं तुला महाराजांच्या प्रकृतीचं कुशलवृत्त समजून घेण्याकरितां पाठविलं होतं ना ? ह्मणूनच तर त्यांनीं मला पुन्हां तुझ्या शोधास पाठविलं आहे.

**कांचनमालाः**—सखे, मदनिके, आपल्या बाईसाहेब कीं नाहीं अगदीं भोळसर आहेत, त्यामुळं सहज बोलतां बोलतां फसतात. दुखण्याचं निमित्त करून व आपली मदनावस्था लपवून ठेवून या वेळेस महाराज दरवाज्यावरील हस्तिदंती गच्चीवर बसले आहेत तर हें वर्तमान सांगायाला आपण दोघीही जाऊं चल. ( असें बोलत बोलत दोघीही निघून जातात. )

[ हा प्रवेशक झाला.

( तदनंतर वर सांगितल्याप्रमाणें मदनपीडित राजा येतो. )

राजाः—( उत्कंठेनें सुस्कारा टाकून. )

पद—"तोम् तननन वाजवि वेणु०" या चालीवर.

ती रमणीय मन्मन रमणा ॥
रमवी या ममहृत्सदना ॥ ध्रु० ॥
मन्मथ पीडा किमपी न सोसे हरिल गमे मत्प्राणा ॥
माझ्या नखशिखांत ती मूर्ति, ठसुनचि गेली पुर्ती ॥
चंचल मन हें लक्ष न ह्मणुनि तव बाणावरि मदना ॥
ती रम० ॥ १ ॥

पद.

कां धरिसी अभिलाष काम तूं हृदया त्या सखिचा ॥
अदय मदन तव तनूस जाळी ताप सोस त्याचा ॥
तच्छमनाचा प्रयत्न न दिसे त्रिजगीं ही साचा ॥
करिसी कां आरोप मजवरी अति तर कोपाचा ॥ १ ॥

तुझी शांती होण्याची संधी दैवयोगानें जवळ आली होती पण ती म्यांच घालविली. केवढें माझें अज्ञान हें! पहा, मोठ्या प्रयत्नानें मिळविलेला—

पद—"जिंकियलें ह्या चंद्रप्रभेसी०" या चालीवर.

चंदन रससम शीतल सखिकर सुखकर किती गमला ॥
बहुत वेळ जरि होता करिं तरि तुजवरि नच धरिला ॥

खरोखर, हें मोठेंच आश्चर्य! पंडितजन तुला चंचल व अरूप मानतात; पण तें मला खरें वाटत नाहीं.

( मागील पद पुढें चालू. )

चंचलता तव अंगीं नाहीं ह्मणुनि कामाला ॥
सांपडसी हें सत्य सत्यरे भासे मन्मतिला ॥
रूप न असतें तरि तुजवरती पंचबाणहल्ला ॥
पंचशरानें कसा करिल हें सांग सकल मजला ॥ १ ॥

( वर पाहून. )

पद—"शीतल सखिकर हा मजला०" या चा०

कुसुमशरासन रतिरमणा ॥

मदना तव शर पांच असति परि असंख्य गमती विरहिजनां ॥ धृ० ॥ बहुधा मत्सम लोक असति किती, सर्व क्षितीवर तीहि न गणती, परी तुझी कृति, निंद्य खरी अति, व्यर्थ लयाला नेत असति कामत्रस्तजन हर हनना ॥ कुसुम० ॥ १ ॥

(कांहीं विचार करून) अरेरे! खरेंच ह्मटलें तर माझी अशी अवस्था झाली आहे; तरी मला माझ्या विषयीं इतकी काळजी नाहीं. परंतु मनांतल्यामनांत गुप्त कोप ठेवणाऱ्या त्या राणीच्या तडाक्यांत ती बिचारी गरीब सागरिका सांपडलेली आहे; तर तिचें कसें होईल? त्याचीच काळजी मला अहोरात्र वाटत आहे. बहुधा या वेळेपर्यंत तिची त्रेधाच उडून राहिली असेल. कारणः—

पद—"दिलचमनके बीचू०" या चा०

ती गुप्त कृति जनीं विदित जाहली ह्मणुनी ॥
बहु दुःख पावली असेल सखि ती स्वमनीं ॥ धृ० ॥
उभयतां अन्य जरि गोष्टी बोलति कोणी ॥
तरि "मजविषयीं कीं?" मानित राहिल सुगुणी ॥
॥ चाल ॥ भयभिता होउनि भारी ॥ सुंदरी ॥
दावाया मुख ती नारी ॥ अंतरीं ॥
लज्जान्वित होउनि मानित राहिल स्वमनीं ॥
कीं व्यर्थ प्रसवली मजला या जगिं जननी ॥ ती० ॥ १ ॥

असो. तिचें वर्तमान समजून घेण्याकरितां मी वसंतकाला तिकडे पाठविलें आहे. पण त्याला तरी इतका उशीर कां लागला? हें कांहीं कळत नाहीं.

(तदनंतर आनंदभरित वसंतक प्रवेश करतो.)

वसंतकः—(अत्यानंदानें) अहाहा! आज माझ्या प्रिय मित्राला माझ्यापासून प्रिय वर्तमान ऐकावयास मिळाल्यामुळें जो

कांहीं आनंद होणार आहे तसा व तितका आनंद ह्या कौशांबीच्या राजाच्या राज्याभिषेक समयींही झालेला नसेल. तर आतां लौकर त्याच्याकडेच जावें आणि ही आनंदाची बातमी सांगून त्याला संतोषित करावें. ( कांहीं चालून व राजास पाहून ) अरे, हाच तो माझा प्रिय मित्र. एकसारखा वाटेकडे डोळे लावून बसला आहे. तर हा माझीच वाट पहात आहे हें खास! ( जवळ जाऊन ) मित्रा, तुझा जयजयकार असो!

**राजाः**—(त्यास पाहतांच हर्षातिशयानें) गड्या, माझी ती प्रिया सागरिका खुशाल आहेना?

**वसंतकः**—( डौलानें ) अहो महाराज, तिचें कुशल आहे किंवा नाहीं तें माझ्या तोंडानें ऐकण्यापेक्षां अगदीं अत्यल्प काळांत तिलाच विचारा ह्मणजे झालें.

**राजाः**—( आनंदानें ) गड्या, खरेंच कां तूं सांगतोस हें? मला तिचें दर्शन देखील होणार आहे, असें ह्मणतोस तू आणखी!

**वसंतकः**—( गर्वानें ) दर्शन कां होणार नाहीं बरें? अरे आपल्या बुद्धिप्रभावानें प्रत्यक्ष वाचस्पतीच्याही चातुर्याचा उपहास करणारा असा हा मी तुझा मंत्री तुझ्याजवळ असतां तिची भेट होण्यास मोठें कठीण तें काय होतें?

**राजाः**—( हंसून ) खरेंच, यांत आश्चर्य मानण्यासारखें कांहींच नाहीं! तुला कोणती गोष्ट अशक्य आहे? कोणतीच नाहीं. बरें पण भल्या माणसा, काय काय कारस्थानें करून आला आहेस तें सांगशील तरी? एकवेळ तें सर्व ऐकण्याची इच्छा फार आहे.

**वसंतकः**—( कानांत सांगून ) ऐकलेंस? कां? कशी आहे अस्मादिकांची मसलत?

**राजाः**—( हर्षानें ) मित्रा, या नाजूक कामगिरीबद्दल हें तुला बक्षीस घे. ( असें बोलत असतां हातांतील कडें काढून त्यास देतो. )

**वसंतकः**—( कडें हातांत घालून व त्याकडे पाहून ) वाहवा! वाहवा! आज आपल्या चातुर्यानें हें अगदीं बावनकशी सोन्याचें रत्नखचित कडें मीं बक्षिस मिळविलें आहे. हें हातांत घातल्यापा-

सून मी एखाद्या मोठ्या राजपुत्रासारखा भाग्यवान् दिसूं लागलों खरा! ( डौलानें ) पहा बरें. मी एवढा मोठा शहाणा आहें. तरी माझी ती भटीण वरचेवर माझा उपहास करते! तर आतां हें तिला दाखविण्यासाठीं मी घरीं जातों. ह्मणजे प्रत्यक्ष राजापासूनही असलीं मोठीं इनामें मिळविण्याचें शाहणपण माझ्यांत आहे, असें समजून ती अंमळशी खजील होईल आणि या वेळचा माझा हा थाट पाहून तिला आनंदही वाटेल. ( राजास ) मित्रा, आतां जरासा थांब तर. हें मी आपल्या बायकोला दाखवून येतों. ( जाऊं लागतो. )

**राजाः**—( त्याचा हात धरून ) छे, या वेळीं जाऊं नको. ती तुझी भटीण कोठेंही जात नाहीं. मग जाऊन दाखविशील. पण गड्या, अजून दिवस किती उरला आहे?

**वसंतकः**—( इकडे तिकडे फिरून पाहून, हर्षानें ) मित्रा, पहा पहा! अतिशय प्रेमानें ज्याचें हृदय अनावर झालें आहे, असा हा भगवान् सहस्ररश्मि वासरमणि संध्यारूपिणी स्त्रीनें भेटीच्या संकेताची खूण केल्यामुळेंच कीं काय अस्ताचलाच्या शिखरावरील दाट झाडींत प्रवेश करीत आहे असें वाटतें.

**राजाः**—( पाहून आनंदानें. ) मित्रा, तूं खरेंच अनुमान केलेंस! हा दिवस बहुतकरून सरल्यासारखाच आहे. हें पहाः—

पद—" मृदुल अशा कमलदलांची हि० " या चा०

**दाहि दिशा परिभ्रमण करुनि अस्त पर्वतीं ॥ ध्रु० ॥**
**योजण्या उपाय हा ॥ बैसला रवि महा ॥**
**क्रमावयास रात्रींत भुवनमार्ग सुलभ रिति ॥ दा० ॥ १ ॥**
**संध्येनें कर जे हरुनि राहिले ते ॥**
**पसरिले असति विमल गगनावरि दीसती ॥ दा० ॥ २ ॥**
**हेम कांतिसम ॥ भासती सुरम्य ॥**
**वाटे दुजे दिक्चक्र न्यावयास करिहि कृती ॥ दा० ॥ ३ ॥**

पद—" बत्नानें देह सारा सुंदरिनें० " या चा०

**अस्ताद्रीवरी स्थापि कर रवि तो नति करी ॥**
**बोले मी स्वपंथानें जातों गे सुंदरीं ॥**

**तोंवरि तूं नीज, येतों उठवाया लौकरी ॥**
**विरहातें अल्प सोशी त्यज खेदातें दुरी ॥ १ ॥**

तर आतां ऊठ. आपण माधवीलतामंडपांत जाऊन त्या प्रियतमेच्या येण्याची वाट पहात बसूं.

**वसंतकः**—फार चांगला विचार काढलास. चल, आपण तिकडेच चाऊं.

( दोघे जाऊं लागतात. )

**वसंतकः**—( चोहोंकडे पाहून ) मित्रा, पहा पहा! वनांतील झाडांच्या विरल रांगांत प्रवेश करून, त्यांला अगदीं सघन करून सोडणारा आणि पुष्ट झालेल्या रानडुकराप्रमाणें, किंवा रेड्यासारखा काळा कुळकुळीत दिसणारा, असा हा पूर्वदिशेला आच्छादन करीत होत्साता अंधकाराचा समुदाय हळूहळू चोहोंकडे पसरत आहे.

**राजाः**—( पाहून ) वाहवा! मित्रा, फार चांगलें उपलक्षण केलेंस!

**साकी.**

**अंधकार हा प्रथम पहारें पूर्वदिशा ही झांकी ॥**
**नित्यक्रमपूर्वक मग नगरें पर्वत व्यापुनि टाकी ॥**
**नंतर जननेत्रां ॥ व्यापित झडकरि हा मित्रा ॥ १ ॥**

तर आतां माधवीलतामंडपाचा मार्ग कोणता तो मला आधीं दाखीव बरें?

**वसंतकः**—( राजाचा हात धरून ) मित्रा, असा असा ये. ( पुढें जातात. ) मित्रा, झाडें दाट असल्यामुळें अंधकाराच्या गोळ्यासारखें दिसणारें हें मकरंदोद्यान जवळ आलें आहेसें वाटतें. तरी पण आतां या ठिकाणीं आपल्याला वाट कशी दिसेल? माझे डोळे तर अंधारानें गच्च भरल्यासारखे झाले आहेत.

**राजाः**—( वास घेऊन ) अरे तुला रस्ता समजला नाहीं, पण मला चांगला समजला आहे पहा—

**पद**—"ह्या मधुतर मुखर नादें०" या चालीवर.

**ह्या चंपकतरुच्या पंक्ति ॥ बघ परिमळ किति तरि देती ॥**

॥धृ०॥ हा सिंदुवार सह दाट ॥ बकुल तरु पाटल हेही ॥ सुंदर रंगानें ह्या डुलती जाती ॥ जाती ॥ ह्या० ॥ १ ॥ ऐसे ॥ ऐसे पादप येथें शोभती ॥ बहुपरिचा सुगंध सोडिती ॥ तम आच्छादित या चिन्हांनीं सुपथ व्यक्त हा करितातां बघ हरुनि मनिंची भ्रांती ॥ भ्रांति ॥ ह्या चं० ॥ २ ॥

**वसंतकः**—मित्रा, अत्यंत मृदु अशा माणकांच्या शिलांवर हळूहळू संचार करणाऱ्या स्त्रियांच्या पावलांच्या आवाजानें सूचित केला जाणाऱ्या ह्या माधवीलतामंडपाच्या अगदीं जवळ आपण आलों. कशावरून ह्मणशील तर पुष्पांचा रस प्राशन करून उन्मत्त झालेले भ्रमर बसल्याकारणानें खालीं पाडणाऱ्या सुवासिक बकुल वृक्षांच्या फुलांच्या वासानें दाहि दिशा सुगंधित केल्या आहेत. तर आतां तूं येथेंच वाट पहात बैस. मी राणीचा वेष घेतलेल्या साग-रिकेला घेऊन येतों.

**राजाः**—जा तर मग, लौकर जाऊन ये.

**वसंतकः**—गड्या, तूं असा घाबरा होऊं नकोस. हा मी आतां येतों.

**राजाः**—तोंपर्यंत मी ह्या माणकांनीं खचलेल्या तुळतुळीत चौथऱ्यावर बसून प्रियेच्या संकेतावसराची वाट पहातों. ( वसंतक गेल्यावर बसून साशंक. )

पद—" वसंतीं बघुनि मेनकेला० " या चालीवर.

कामीजन निज गृहिणीला ॥
अनादरुनियां आदरिताती नूतन युवतीला ॥ धृ० ॥
ठरलेल्या स्थलिं अशि अबला ॥
चोरुनि येते परी भासते प्रियकर पुरुषाला ॥
कोणी पाहिल आपणाला ॥
या शंकेनें डोळेभरही बघे न वदनाला ॥
रतीचा कर करिं धरलेला ॥
भीतीनें करि यत्न करांतुनि मुक्त करायाला ॥ १ ॥

## दिंडी.

कंठिं आलिंगन समर्थि हृदयदेशीं ॥
न दे लागूं कुच जपे ताशि करांसी ॥
जरी आलो तरि वदे जाउं द्या हो ॥
रम्य गमते ती कामुका सदा हो ॥ १ ॥

(कांहीं थांबून एकाएकीं) अरे पण अजून वसंतक कां येत नाहीं ? कदाचित् राणी वासवदत्तेला तर ही आमची मसलत समजली नसेल? ( स्वस्थ बसतो. तों वासवदत्ता व कांचनमाला प्रवेश करितात. )

**वासवदत्ताः**—अगे, कांचनमाले, खरंचका माझा वेष घेऊन सागरिका आर्यपुत्राला भेटणार आहे ?

**कांचनमालाः**—हो, खरंच. नाहींतर मी बाईसाहेबांच्या जवळ खोटें बोलेन काय ? पण इतकं कशाला ? चित्रशाळेच्या दरवाज्यांत वसंतक वाट पहात बसला असेल, त्याला पाहिलं म्हणजे सहज आपल्या मनाची खात्री होईल.

**वासवदत्ताः**—तर मग तिकडेच आधीं जाउंया.

**कांचनमालाः**—बाईसाहेब असं असं यावं. ( कांहीं चालतात तों डोकीवर बुरखा घेतलेला वसंतक येतो. )

**वसंतकः**—( कानोसा घेऊन. ) हा येथें जवळच पैंजणांचा ध्वनि ऐकूं येत आहे, तेव्हां सागरिका आली असावी, असें वाटतें.

**कांचनमालाः**—बाईसाहेब, आपण अगदीं चित्रशाळेच्या दरवाज्यांत येऊन पोंचलों आहों; तर आतां आपण क्षणभर येथेंच उभं राहावं. मीं वसंतकाला आल्याची खूण करितें. ( कांहीं चालून चुटकी वाजविते. )

**वसंतकः**—( हर्षानें हंसत जवळ जाऊन. ) सुसंगते, तूं तर कांचनमालेचा वेष अगदीं हुबेहुब घेतलास ! शेंकडो मशालींचा उजेड धरून, कितीही बारीक दृष्टीनें पाहिलें तरी या वेळेस तूं कांचनमाला नव्हेस असें कोणासही वाटणार नाहीं. बरें, पण सागरिका कोठें आहे ? आमचें मुख्य पात्र कायतें तें.

**कांचनमालाः**—( बोटानें दाखवून ) ही पहा.

**वसंतकः**—( पाहून आश्चर्यानें ) ही तर खरोखर वासवदत्ताच आहे.

**वासवदत्ताः**—( घाबरून कांचनमालेस एकीकडे ) कांचनमाले, यानं मला ओळखलं; आतां काय उपयोग आहे? तर मी परत जातें. ( जाऊं लागते. )

**वसंतकः**—बाई सागरिके रागाऊं नकोस; अशी इकडे ये.

**वासवदत्ताः**—( हंसत उभी राहून कांचनमालेकडे पाहते. )

**कांचनमालाः**—बाईसाहेब, पाहिलेंतना तुह्मीं हें?

**वसंतकः**—बाई सागरिके, त्वरा कर. हा पहा पूर्वदिशेकडून भगवान् मृगलांछन चंद्रमा उदय पावत आहे तर लौकर चल.

**वासवदत्ताः**—( घाबरून व पूर्वेकडे पाहून )

पद्–"भूपती खरे ते वैभव सुख०" या चा०

**हे शिवभूषण हे मृगलांछन निशिनाथा ॥**
**करितें मी हें अभिवंदन तुज भगवंता ॥ धृ० ॥**
**तव देह निमिषभर नको दाखवूं आतां ॥**
**प्रार्थना माझी आणुनियां हे चित्ता ॥ चाल ॥**
**मी झुरतें ज्याच्याकरितां ॥ अंतरीं ॥**
**किति असे प्रीति ती त्याची ॥ मजवरी ॥**
**पाहतें जाउनी आतां ॥ सत्वरीं ॥**
**यास्तव तूं क्षणभर रहा लपुनि भगवंता ॥**
**बघ खेळ आमुचा सर्व तेथुनी आतां ॥ हे शिव० ॥ १ ॥**

( सर्व लतामंडपाकडे जातात. )

**राजाः**—प्रियेचा समागम होण्याची वेळ अगदीं जवळ येऊन ठेपली आहे, असें असतां माझें मन अतिशय व्याकुळ होतें, याचें कारण काय? आतां तर माझ्यानें मुळींच धीर धरवत नाहीं. अथवाः—

पद—"निजरूप हिला मी दावूंका०" या चालीवर.

**छळिलें अनंगें कधि न असें ॥ मज० ॥**

**खलाभ समयीं तीव्र होउनी हृदय-**
**नगाप्रति भेदितसे ॥ धृ० ॥**

अथवा उघडच आहे:—

**प्रावृट्काळीं ज्या दिवशीं अति ॥**
**वर्षावाचीं चिन्हें दिसती ॥**
**होतो उष्मा त्या समयीं किति ॥**
**अनुभव हा सकलांस असे ॥ मज० ॥ १ ॥**

**वसंतकः**—( ऐकलेंसें करून ) बाई सागरिके, हा पहा माझा प्रियमित्र केवळ तुझीच वाट पहात बसला असून, तुलाच उद्देशून अगदीं मोकळ्या स्वरानें आपल्याशींच कांहीं बोलत आहे. तर तूं अंमळ येथेंच उभी रहा. मी त्याजपाशीं जाऊन तूं आली आहेस असें कळवितों.

**वासवदत्ताः**—( मान हालवून उभी राहते. )

**वसंतकः**—( राजाजवळ जाऊन ) मित्रा, तुझें नशीब फळ-फळलें! ही पहा सागरिका आली.

**राजाः**—( चट्कन उठून हर्षानें ) अरे कोठें, कोठें आहे ती?

**वसंतकः**—अरे ही पहा.

**राजाः**—( जवळ जाऊन ) प्रिये सागरिके,

**पद**-"नंदगृहाच्या जवळ मुलीनों०" या चा०

**मुख शीतांशुची आहे हा तव नयन कमलकांती ॥ प्रिये गे ॥ कोमल तव कर मृणाल समकीं पद्में जणुं गमती ॥ खचित गे ॥ कर्दलिस्तंभा परि या मांड्या रम्य किती दिसती ॥ सखे गे ॥ बाहु तुझे हे कमलतंतुसम शोभा किति देती ॥ खचित गे ॥ इंद्रियगण तव घेउनि ऐसा मार मिठी सुदती ॥ मजसिगे ॥ १ ॥**

सुंदरीः—

**पदः**—"जानत प्रीत रीत रघु०" या चा०

**शांतवि कामें कोप लवलाहि ॥ हा शांत० ॥**

**ठेवुं नको शंकेचा मनिं फासा सौख्यद तो मुळिं नाहीं॥धृ०॥ दूर राहुनि व्यर्थ जाळिशी प्राणदयिते तनु मम ही ॥ आलिंगन दे येये सखये संगमिं उत्सुक होई ॥ १ ॥**

**वासवदत्ताः**—( दुःखातिशयानें कांचनमालेस. ) कांचनमाले, स्वतः आर्यपुत्र या वेळेस असें बोलत आहे. बरं पण पुनः हा माझ्याशीं कोणत्या तोंडानं बोलेल बरं?

**पदः**—" जानत प्रीत रीत रघुरायी० " या चालीवर.

**जातहि क्रूर नरांचि ग बाई ॥ हो जातहि० ॥ धृ० ॥ कां यांचे मनिं वाटे नच लज्जा, शांति न यांप्रति कांहीं ॥ हो जातहि० ॥ १ ॥ दाखविती सुप्रेम स्त्रियांवरि कपट स्तुतिची चतुराई ॥ पाहुनि भुलती युवतीजन परि दुःखा कारण होई ॥ हो जातहि० ॥ २ ॥**

**कांचनमालाः**—( हळूच ) बाईसाहेब, या साहसीपुरुषांना कोणत्या गोष्टी संभवत नाहींत असं आपणांस वाटतं? सर्व कांहीं संभवतं.

**वसंतकः**—अगे सागरिके, आतां थोडीशी लाज सोड आणि स्वस्थ चित्त होऊन माझ्या प्रियमित्राबरोबर बोलूं लाग लौकर. पहा, आजपर्यंत सदा सर्वकाळ फणफणणाऱ्या देवी वासवदत्तेच्या दुर्वचनांनीं ह्या माझ्या मित्राचे कान अगदीं किटून गेले आहेत. तर आतां आपल्या मधुर भाषणांनीं याला संतुष्ट कर.

**वासवदत्ताः**—( रागानें एकीकडे वळून ) अग कांचनमाले, खरंच काग मी अशी कडू बोलणारी आहें? आणि हा आर्य वसंतक मात्र मधुर बोलणारा आहे, नाहीं बरं?

**कांचनमालाः**—( वसंतकास हळूच बोटानें दाबून ) अरे कपाळफुटक्या, भरलीं तुझीं शंभर वर्षे, आतां काय बोलतोस याची तुला चांगली आठवण होईल बरं!

**वसंतकः**—( वर पाहून ) मित्रा, इकडे पहा! इकडे पहा! हा रागावलेल्या कामिनीच्या लाल झालेल्या गालांप्रमाणें आरक्त दिस-

णारा आणि पूर्व दिशेस प्रकाशित करणारा असा भगवान् शीतांशु नुकाच उदय पावत आहे.

राजाः—( वर पाहून )

पद–"वस्त्रानें देह सारा०" या चालीवर.

तव वदनें कांति याची बघ कांते लोपली ॥
यास्तव हा सूड घ्याया शशि आला सुस्थलीं ॥
धर करुनी निजकरासी उदयाद्रीनें भली ॥
तव कृति ही प्रतीकारास्तव मोठी मांडली ॥ १ ॥

आणखी हा उदय पावणारा चंद्रमा आपलें जडत्व कसें दाखवीत आहे तें प्रिये तूं पहात आहेसना?

पद.

वदनचंद्र तव असुनि अन्य हा चंद्र उदय कां पावतसे ॥
दर्शन होतां मीनकेतुसी भरती काय न येत असे ॥ धृ० ॥
अथवा नयना तोष न देतो खरें काय तें कळत नसे ॥
जरी वदावें शीतांशूसी सुधारसाचा गर्व असे ॥
तरी जिवलगे सत्य सांगतों तव अधरींही ऊन नसे ॥ १ ॥

वासवदत्ताः—( तोंडावरचा बुरखा काढून रागानें. )

सागरिका तव हृदयीं भरली ॥
म्हणून कां ही धुंदी चढली ॥
सागरिकामय सृष्टी सगळी ॥
परि नोहे ही तिच आली ॥

राजाः—( वासवदत्तेस ओळखून लज्जित होत्साता )

अपराध इथें नच गुणसरिते ॥ रूप तुझ्यासम भूप पाहुनी लोलुप झाला प्रेमरसें ॥

( वासवदत्तेपुढें गुडघे टेंकून व हात जोडून अत्यंत लज्जा आणि विनययुक्त—)

प्रिये तव दास, असे हा खास, क्षमा करि यास, दुजी नच आस ॥ प्रिये तव० ॥

**वासवदत्ताः—**

कपटपटो हे शब्द ऐकतां अंग तप्तता धरीतसे ॥
"प्रिये-प्रिये" वद तिकडे जाउनि प्रिया तुझी
मी आज नसें ॥

**राजाः—**

वच कंटक हे लंपटासि या साहतील सुंदरी कसे ॥
खरवाक्शर हाणिसी तरी ही प्रिया न तुजविण
अन्य असे ॥

**वासवदत्ताः—**

पुरे पुरे हि तुमची स्तुती ॥ मज आली आज समजुनि
ती ॥ दाखवा मजा ही पुरती ॥ त्या नव प्रियेच्या
पुढती ॥ असे कपटि खरी ॥ नर जाति पुरी ॥

**राजाः—**

शपथ नसे मनिं कपट प्रियेगे व्यर्थ वदसि तूं मजसि
असें ॥ तुजसि हे प्राण, अर्पिले जाण, नसे मज आण,
तुझ्याविण त्राण ॥ १ ॥

**वसंतकः**—( आपल्याशीं ) आतां येथें करावें तरी काय? युक्ति तर कांहींच सुचत नाहीं. असो. ( उघड ) बाईसाहेब, आपण मोठ्या पोक्त विचारी आहां. माझ्या मित्रानें असें करूं नये, पण चुकून गोष्ट घडली, त्याला आतां कांहीं उपाय नाहीं. तथापि हा एवढा एक अपराध आपण सहन करावा, अशी मी आपणांजवळ प्रार्थना करितों.

**वासवदत्ताः**—भावोजी, मुळीं अपराध असेल तर क्षमा करावयाचीना? यांच्या प्रथम संगमाला मी विघ्न करणारी झालें ह्मणून मीच आर्यपुत्राची अपराधी आहें. तर त्यांनींच मला क्षमा केली पाहिजे.

**राजाः**—प्रिये, मला तूं अपराधांत चांगलेंच धरलें आहेस, तेव्हां आतां यांबद्दल काय बोलावें हेंच मला सुचत नाहीं. तथापि तुजपाशीं माझी एक विज्ञापना आहे:—

पद–" जिंकियलें ह्या चंद्रप्रभेसि० " या चा०

लज्जित हा मी दास तुझा गे मत्प्रियकर रमणी ॥
मदीय मस्तक घांशितसें हें सखये तव चरणीं ॥ ध्रु०॥
काढिन लाक्षारसकृत लाली जाण पदांवरली ॥
परि मत्कांते स्पष्ट दिसती तव मुखचंद्रावरली ॥
कोपग्रहणें असती जीं तीं सर्वहि आलेलीं ॥
हरीन मी जरि दया करिसि तरि तूं मम प्रियकरणी ॥

( असें बोलत असतां तिच्या पायां पडतो. )

**वासवदत्ताः**—( हातानें त्याचें निवारण करून ) प्राणनाथ, उठा उठा! उगीच कशाला पायां पडतां? आपलं मन अशा प्रकारचं आहे, असं जाणून पुनः आपणांवर कोप करणाऱ्या मनुष्यास केवळ दुर्जन किंवा मूर्ख आहे असं ह्मटलं पाहिजे. असो. आतां उगीच मी तुमच्या क्रीडेंत विघ्न कशाला करूं? मी आपली जातें. आतां आपण या ठिकाणीं खुशाल हवं तें करावं. (रागानें जाण्याची तयारी करते.)

**कांचनमालाः**—बाईसाहेब, ह्यावेळीं प्रसन्न व्हानां कां? महाराज आर्जवं करून पायां पडताहेत. तें अमान्य करून जाल तर खरोखर सांगतें कीं, पश्चात्ताप पावाल.

**वासवदत्ताः**—अग जा, वेडी कुठली! आतां इथं पश्चात्ताप होण्याचं कारण काय राहिलें आहे? आणि तो करून तरी घेत आहे कोण? चल लौकर येथून कशी! ( दोघीही जातात. )

**राजाः**—प्रिये प्रसन्न हो प्रसन्न हो. (" लज्जित हा मी दास" इत्यादि पूर्वोक्त पद्य पुनः ह्मणतो. )

**वसंतकः**—अहो महाराज, उठा आतां. ती तुमची रागीट बायको गेली. तर आतां तुह्मी येथें उगीच अरण्यरोदन कां करतां?

**राजाः**—( वर पाहून ) अरे, शेवटीं देवी मजवर अनुग्रह केल्यावांचून कशी गेली बरें?

**वसंतकः**—आणखी अनुग्रह तो कसला करावयाचा? आमच्या शरीराला कांहीं इजा झाली नाहीं, हा कांहीं लहानसहान अनुग्रह नव्हे. मलातर आपणावर मुष्टिमोदक खाण्याची पाळी येईल असेंच

वाटलें होतें. होय करतां काय! असल्या जबरदस्त बायकांच्या खोड्या केल्या आणि त्यांनीं जर का ठोकलें, तर तुमच्यासारख्या नेभळ्या नवऱ्यांच्या हातून काय होणार?

**राजाः**—हा मूर्खा! भलत्याच वेळीं काय थट्टा करतोस? ह्या अनर्थाला सर्वांशीं कारण तूंच आहेस. पहा कसा तो:—

पद—"वीरशिरोमणी सकल धनुर्धर०" या चालीवर.

**बहुमानानें प्रीति तिच्याशीं वाढविली निशिदिनीं॥**
**राहिलों प्रेमें बहु रंगुनी॥ धृ०॥**
**आजवरी म्यां असें न केलें कपट कधीं ह्मणउनि॥**
**जाहली प्रिया तप्त निजमनीं॥ चाल॥**
**ही माझी पाहुनि करणी ती प्रियशिला॥**
**त्यागील भासतें प्राण खचित आपुला॥**
**अत्यंत प्रीतिचा परिणामच हा भला॥**
**विमल प्रेम मी तोडुनियां तद्धाता झालों धनी॥**
**राहिलों जो प्रेमें रंगुनी॥ १॥**

**वसंतकः**—गड्या, उगीच भलतें सलतें कशाला बोलतोस? हा तुझा मित्र वसंतक अगदीं नुकताच परदेशांतून आला आहे असें नाहीं. याला सर्व कांहीं माहित आहे. एकंदरींत राणीसाहेबांजवळ आपली पत कितपत आहे, हें सर्व मी जाणतों. आतां त्या राणीच्या कोपाग्नीला ती बिचारी सागरिका मात्र आहुती होणार आहे. बाकी सर्वांचें ठीकच आहे.

**राजाः**—मित्रा, मीहि त्याच काळजींत आहें. हाय हाय! प्रिये सागरिके, आतां तुला कोण संभाळील?

(इतक्यांत वासवदत्तेचा वेष धारण करणारी सागरिका येते.)

**सागरिकाः**—(भयानें)

पद—"जाइं परतोनी बाळा०" या चालीवर.

**छळिसी किती मजसी दैवा॥ छ०॥ सिंहलेशनृपतनया प्रिय मी, बनलें बटिक अशी॥ दैवा०॥ धृ०॥**

महा विधात्या निर्मुनि अंतीं दुःखसागरीं लोटिशी ॥
परवशताही जाळी तनुशीं, माझ्या दिवस निशीं ॥ दै०॥

बरं झालं; बाईसाहेबांचा वेष घेऊन ह्या संगितशाळेंतून येत असतां मला कोणी ओळखलें नाहीं, ही दैवानें मजवर मोठी कृपाच केली. बरें, एथपर्यंत सर्व ठीक झालें; पण आतां पुढें काय करावयाचें? (डोळ्यांत पाणी आणून चिंताक्रांत होत्साति उभी राहते.)

**वसंतकः**—अहो, मूढासारखे उगीच उभे काय राहिलां आहां! आतां पुढें काय उपाय करावा? याचा कांहीं विचार करा.

**राजाः**—मित्रा, मी त्याच विचारांत आहें.

**सागरिकाः**—(अश्रु पुसून) उगीच कशाला आशा करीत बसावं, ह्या अशा दुःखकारक स्थितींत राहण्यापेक्षां मरण बरं. कारण मला या दुःखांतून मुक्त करण्याची आर्य वसंतकांनीं जी मसलत केली होती, ती माझ्या फुटक्या नशिबानें उघडकीस येऊन माझी प्रियसखी सुसंगता बाईसाहेबांच्या हातीं सांपडली. तर आतां फट फजिती करून घेण्यापेक्षां ह्या अशोकवृक्षाखालीं जाऊन गळफांस लावून घ्यावा आणि आत्महत्त्या करावी.

**राजाः**—मित्रा, राणीला प्रसन्न केल्यावांचून दुसरा कांहीं विचार दिसत नाहीं. तर चल आतां तिकडे जाऊं.

**वसंतकः**—अरे थांब, अंमळ थांब. पावलें वाजल्यासारखें कांहीं ऐकूं येत आहे. मला वाटतें कीं राणीला पश्चात्ताप होऊन कदाचित् ती तुझी क्षमा मागावयासाठीं येत असेल.

**राजाः**—मित्रा, कदाचित् तसेंही असेल. ती माझी प्रिया मोठ्या उदार मनाची आहे. लक्ष्यपूर्वक पहा बरं तीच आली आहे कीं कायतें? [ वसंतक पाहण्यासाठीं पुढें जातो. ]

**सागरिकाः**—(अशोकवृक्षाखालीं जाऊन) ओहो! मी इतका वेळ उगीच घालविला! ही मोगरीची वेल मला गळफांस लावून घेण्याच्या कामीं मोठीच उपयोगी आहे तर–(वेलीचा फांस करून.)

पद—"जात ही क्रूर नरांचि०" या चा०

लावुनि फांस खास कंठातें ॥ हा ला० ॥ घालवितें निज

हातें आजि दुःख सकल विलयातें ॥ लाउनि फां० ॥धृ०॥
तारण आतां नच मरणाविण या समयीं मजला गमतें ॥
स्वीकारुनियां तेच अतां मी सुखशांतीसचि वरितें ॥ १ ॥

( गळफांस लावते )

**वसंतकः**—( फांस लावीत असलेला पाहून ) कोण ही? देवी वासवदत्ता! ( गडबड करून मोठ्यानें राजास हांक मारतो ) अरे मित्रा, लौकर धांव! लौकर धांव आणि रक्षण कर. ही पहा देवी वासवदत्ता गळफांस लावून घेऊन आत्महत्या करीत आहे.

**राजाः**—( धाबरून व जवळ जाऊन ) कोठें आहे, कोठें आहे ती?

**वसंतकः**—अरे ही पहा समोर!

**राजाः**—( तिच्या गळ्यांतलि फांस काढून प्रेमानें ) अगे साहस करणारे वेडे, तूं हें काय बरें योजिलें आहेस?

पद—"सगुणरूप निज०" या चालीवर.

असासि गुणांची खाण ॥ प्रिये तूं ॥ असासि गु० ॥धृ०॥
पाहुनि कंठीं फांस तुझ्या मम, कंठीं आले प्राण ॥ प्रि० ॥ १
नको करूं हें साहस कांते, विनती ही मनिं आण ॥ प्रि० ॥ २ ॥ फेंकुनी दे हा फांस झडकरी, करि आतां मत्त्राण ॥ प्रि० ३ ॥

**सागरिकाः**—( ओझर्ते सप्रेम राजाकडे पाहून ) काय! हे महाराज, इथं कसे आले? ( आनंदानें मनांत ) अहाहा!

पद —"केरव्याच्या चालीवर."

असे किती रम्य रूप हें छान ॥ असे० ॥ पाहुनि हरपे भान ॥ धृ० ॥ जीवंत असण्या विषयीं होतो ॥ अभिलाषाचि उत्पन्न ॥ अ० ॥ १ ॥ प्रेमानें दाटोनि हृदय हें ॥ व्याकुळ होती प्राण ॥ अ० ॥ २ ॥ कृतार्थ झालें अंतिं पाहुनी ॥ देति सर्व ज्या मान ॥ अ० ॥ ३ ॥

( उघड ) महाराज,

पद—"ऐका इतुकें प्राणनाथा०" या चालीवर.

नका मजसी अडवूं येथें तुह्मां हीच असे विनती ॥

दैवहीन हा जन पाहे पराधीन जगतीं ॥ धृ० ॥
गोड अशि संधी नसे पुन्हां मरावया हो मला ॥
नका तोडुं तुह्मीही त्या ॥ सुप्रिय देवीची प्रिती ॥ १ ॥

राजाः—( ओळखून अत्यानंदानें ) अरे, ही माझी प्रिया सागरिका.

पद—" बाल सदर "

अग कां असें साहस सखये त्वां हें मांडिलें असशी ॥
नको करूं भलभलतें दाटलें प्रेम मजसी ॥ धृ० ॥
सोड वल्लीपाश त्वरें नयनीं सले माझिया ॥
कंठिं बाहुपाश घालि ॥ सुखवि या निज दासासी ॥ १ ॥

( तिच्या हाताचा विळखा बळेंच आपल्या मानेस घालूं लागतो व ती झिडकारल्यासारखें करते. )

पद–" हं मदंगा लावुं नका० " या चालीवर.

त्या अनंगा धीर नसे अरि शांत करी मम ताप हरी ॥
करी त्वरा दृढ हृदयिं धरी ॥ अरि शांत करी मम० ॥ धृ० ॥

सागरिकाः—
क्षणैक यौवन सुख सेवाया ॥ भ्रष्ट करूं कां अपुली काया ॥ नको नको मज श्रम हे वांया ॥

राजाः—
मानु नको श्रम हे निज अंतरिं ॥ प्रेम धरी अरि शांत करी ॥ करी त्वरा० ॥ १ ॥

सागरिकाः—
प्रेमझरा मम शुष्क जहाला ॥ मुकलें जगिंच्या सकल सुखाला ॥ विसरुं नका परि या दासीला ॥

राजाः—
दास तुझा हा घे पदरीं ॥ मम हृदयमंदिरीं वास करी ॥ करी० ॥ २ ॥

सागरिकाः—
कोठें ऐसी दैववान मी ॥ होईन प्रियकर तुह्मांना मी ॥
नको आसं ही मजशीं स्वामि ॥

**राजाः—**

**खास अंतरिं धीर धरी ॥ तुज सुखशिखरीं ठेवीन खरी ॥ करी० ॥ ३ ॥**

**सागरिकाः—**

**धीर जरी किति धरिला तरि मी ॥**
**व्यर्थ असे हो सकलहि स्वामि ॥ उठाठेव ही नको रिकामी ॥ दावितसाहि प्रीत पुरी ॥ परि नाहिं बरि ॥**

**राजाः—**

**तूं अदय खरी ॥ करी त्वरा० ॥ ४ ॥**

( एकमेकांस आलिंगनें देऊन ) मित्रा, वसंतका, कामाग्नीनें संतप्त झालेल्या या माझ्या हृदयास शीतल करणारी मेघवृष्टि आकाश गाजल्यावाजल्यावांचून होत आहे ह्मणावयाची ?

**वसंतकः**—गड्या, तूं ह्मणतोस हें खरें आहे. पण अकालीं येणाऱ्या वावटळीचें रूप धारण करून राणीवासवदत्ता इतक्यांत न येईल तर; नाहीं तर ही वृष्टि कोणीकडल्या बाजूला उडून जाईल कोणास कळे. ( इतक्यांत कांचनमालेसह राणी वासवदत्ता येते. )

**वासवदत्ताः**—कांचनमाले, मी मोठा निष्ठुरपणा केला नाहीं बरें?

"अंजनीगीत"

**पूर्वीं जें त्वां कथिलें मजला ॥ त्याचा हा गे अनुभव आला ॥**
**पायां पडतां प्राणपतीला ॥ झिडकारुनि आलें ॥ १ ॥**
**अनुतापें हें शरीर आतां ॥ तापुनियां मन वेष्टित चिंता ॥**
**यास्तव चल गे त्या प्रियकांता ॥ शांतविण्या जाऊं ॥ २ ॥**

**कांचनमालाः**—वाहवा ! बाईसाहेब, आपणावांचून असें आणखी कोणाच्या मनांत यावयाचें आहे ? महाराज हवं तें करोत, त्यांचा धर्म त्यांच्याकडे; चला तर, लौकर जाऊन महाराजांस प्रसन्न करून घेऊं ( दोघी पुढें जातात. )

**राजाः**—( सागरिकेस ) अग वेडे, अजूनही तूं आमचे मनोरथ पूर्ण करीत नाहीसना?

**कांचनमालाः**—बाईसाहेब, महाराजांचा शब्द अगदीं जवळ

ऐकूं येत आहे. यावरून मला असं वाटतं कीं, ते ही तुमचंच समाधान करण्याकरितां इकडे येत आहेत, तर चला आपणच लौकर त्यांच्या जवळ जाऊं.

**वासवदत्ताः**—असं असेल तर गडे, मागल्या बाजूनं मी त्यांचे डोळे गच्च धरीन आणि त्यांचें चित्त प्रसन्न करून घेईन.

**वसंतकः**—बाई सागरिके, आतां कां व्यर्थ संकोच धरितेस? अगदीं मोकळ्या मनानें या माझ्या प्रिय मित्रापाशीं चार शब्द बोल.

**वासवदत्ताः**—( ऐकून रागानें ) कांचनमाले, अग इथं ती कारटी सागरिकाही आहे! तर आतां आपण एकदम पुढं न जातां इथंच आड उभ्या राहून यांचीं काय काय बोलणीं चालतात तीं ऐकूं.

**सागरिकाः**—महाराज,

पद—"लाविली थंड उटी वाळ्याची०" या चा०

**लोभ हा व्यर्थ कशाला ॥ लटका लो० ॥ कथितां मज भोळीला ॥ धृ० ॥ प्राणाधिक जी देवी तिजला दुःख द्यावया कांहो सजलां ॥ ज्या गोष्टी घडणें अति दुर्घट ध्यास नको त्यांचा जीवाला ॥ लटका० ॥ १ ॥**

**राजाः**—हें मात्र तूं अगदीं खोटें बोललीस! कारण-राणीवर कांहीं माझी विशेष प्रीति आहे असें नाहीं.

पद—"चाल सदर"

**प्रेमरसाचा ठेवा ॥ अवघा प्रे० ॥ चोरियला अससी खचये त्वां ॥ रागें वक्राभ्रुमुखती करितां पांयां पडतों मीही तेव्हां ॥ भीतीनें कंपित मी अतिशय श्वासें तीं स्तन कांपवि जेव्हां ॥ अवघा प्रे० ॥ १ ॥ मौन धरीते देवी जेव्हां गोड बोलतों मी ही तेव्हां ॥ कुलीन मी त्या स्थितिला राखुनि करितों सारें जेव्हां तेव्हां ॥ अवघा प्रे० ॥ २ ॥**

**वासवदत्ताः**—( एकाएकीं पुढें येऊन रागानें ) प्राणनाथ, फार चांगलं हें! आपल्या कुलीनपणाला शोभतं ना सारं?

**राजाः**—( वासवदत्तेस पाहतांच लज्जा व भयकंपित ) देवी,

तूं माझ्यावर विनाकारण कोप करूं नकोस तुझ्यासारखा वेष दृष्टीस पडल्यामुळें ही तूंच आहेस असें समजून आह्मीं येथें आलों तरीही न जाणतां कांहीं अपराध घडला असें तुला वाटत असेल, तर क्षमा कर. ( असें बोलून पायां पडतो. )

**वासवदत्ता**:—महाराज, उठा उठा! कुलीनपणाला अनुचित अशी ही सेवा आतां पुरे करा! प्रेमरसाचा ठेवा तिच्यासाठींच राहूंद्या.

**राजा**:—[ वसंतकास ] हें देखील आमचें बोलणें देवीनें ऐकलें काय? तर आतां हिला प्रसन्न करून घेण्याची आशाच राहिली नाहीं. ( खाली तोंड करून उभा राहतो. )

**वसंतकः**—बाईसाहेब, तुह्मी आपल्या रागावणारच, तर खुशाल रागावा; पण खरा प्रकार पाहाल तर असा आहे कीं, तुमचा वेषधरून ही गळफांस लावून घेत असतां-प्रत्यक्ष तुह्मींच रागानें जीव देत आहां, असें समजून प्रियमित्राला मीच या ठिकाणीं घेऊन आलों. यावरून आमचा हेतु काय होता? याचा क्षणभर विचार करा. त्याच-प्रमाणें मी बोलतों हें खरें वाटत नसेल तर तो मोगऱ्याच्या वेलीचा फांस केलेला प्रत्यक्ष पडला आहे, तो पाहून आपली खात्री करून घ्या.

**वासवदत्ता**:—कांचनमाले, त्या वेलीच्या फांसानेंच ह्या दुष्ट भटाला आणि त्या दांडग्या पोरीला बांधून पुढें घेऊन चल.

**कांचनमाला**:—आज्ञा बाईसाहेब. ( वसंतकाच्या गळ्याला तो वेलीचा फांस बांधून व त्याच्या शेवटानें त्याच्या पाठीवर मारून ) कपाळ फुटक्या, भोग आतां आपल्या दांडगेपणाचें फळ! वासवदत्तेच्या कटू भाषणांनीं महाराजांचे कान किटले, इत्यादि बोलणीं आठवतील का आतां? ( दोघांसही एकत्र बांधून घेऊन जाऊं लागते. )

**सागरिका**:—( जातां जातां आपल्याशीं. )

पद–"नृपालकोपशांत०" या चालीवर.

**अघोरपापिणी असेहि मीं खरीं ॥**
**पाहिन कां सखा पुन्हां जगांतरीं ॥**
**त्यजुनि प्राण जगति धन्य व्हावयां अजी ॥**

इथें, अशी, हि पातलें ॥
परी या दैवें ॥ वेळ साधिली ॥ १ ॥

**वसंतकः**—( दुःखानें रडत राजास. ) मित्रा, मला देवी बांधून घेऊन चालली आहे व मी गरीब, अनाश्रित ह्या महत्संकटांत पडलों आहे, हें ध्यानांत ठेव. मला विसरूं नको. ( डोळे पुशीत पुशीत राजाकडे पाहतो. )

( वासवदत्ता, कांचनमाला, सागरिका आणि वसंतक हीं जातात. )

**राजाः**—( खेद पावून आपल्याशींच ) हाय हाय ! काय प्रसंग हा !

पद–" कितीतरी पाहांटेचि वेळ० " या चालीवर.

**मना तुला शांति सुखें रंजवितें असें न राहिलें जनीं ॥धृ०॥**
**दीर्घ रोषयुक्त ह्मणुनी ॥ हास्य नसे ज्या वदनीं ॥**
**कांता अति मानिनिती रोशयुक्त या जनीं ॥ म० ॥ १ ॥**
**सागरिका गुणनिधान ॥ मित्र वसंतक सुजाण ॥**
**साहतील शब्दबाण ॥ खिन्न बहुत होउनी ॥ म० ॥ २ ॥**
**कोणास्तव करुं चिंता ॥ कांहिं सुचेना चित्ता ॥**
**दुःखमयच सर्व कथा ॥ भासतसे लोचनीं ॥ म० ॥ ३ ॥**

असो. आतां याठिकाणीं बसून तरी काय उपयोग आहे ? कांहीं नाहीं. चला तर, देवीला प्रसन्न करण्याकरितां अंतःपुरांत जावें हेंच योग्य. ( असें बोलून निघून जातो. )

## " संकेत नामक " तिसरा अंक समाप्त.

---

## अंक चवथा.

( तदनंतर राजवाड्यांतील एका खोलींत हातांत रत्नमाला घेतलेली सुसंगता रुदन करीत प्रवेश करिते. )

**सुसंगताः**—( सुस्कारा टाकून करुणस्वरानें ) हे प्रिय सखे, सागरिके, किती तरी मी आतां तुझी आठवण करूं ? तुझा तो अति-

शय लाजाळू स्वभाव, आपल्या मैत्रिणीविषयींचें प्रेम, उदारता आणि ती तुझी सुकुमार मूर्ति माझ्या मनांतून कधींही जाणार नाहीं. मेल्या दैवा ! तूं खरोखर निर्दय आहेस, त्वां तिला इतकी सुंदर व सुकुमार कां केलं बरं ? पण तुला तरी बोलून काय उपयोग ? ( कांहीं वेळ स्तब्ध राहून ) ती माझी प्रियसखी आतां माझ्या दृष्टीस पडेल काय ? ( कांहीं विचार करून ) ही रत्नमाला कोण्या ब्राह्मणाला द्यावी, असं तिनं मला सांगितलं आहे, तेव्हां एक ब्राह्मण पाहतें. ( पडद्याकडे पाहून ) बरं झालं हा वसंतक इकडे येत आहे, तर यासच ही अर्पण करावी.

( इतक्यांत हर्षयुक्त वसंतक प्रवेश करितो. )

**वसंतकः**—( आनंदानें )

**कटाव.**

**प्रियकर माझा मित्र फांकडा ॥ मीही अक्कडबाज बांकडा ॥ अकलेचा तर केवळ गाढा ॥ होतो परंतु बाईल वेडा ॥ मित्र मिळाला मजसि ह्मणुनी ॥ दुर्धर काराग्रहांत पडलों ॥ परि दैवाला करुणा आली ॥ मित्रावरती प्रसन्न झाली ॥ वासवदत्ता राणी त्याची ॥ तिनेंच मजला मुक्त करोनी ॥ षड्रस अन्नें बहु प्रेमानें खाऊं घातलीं निज हस्तानें ॥ लाडू, घीवर, क्षीर, करंज्या,॥ जिलब्या, मांडे, दडे, घारगे ॥ भजी लोणचीं परोपरीचीं ॥ खातां खातां वीटहि आला ॥ कळा लागल्या या पोटाला ॥ आणखी कोरा धोतरजोडा ॥ कानामध्यें छान चवकडीं ॥ दिधला हा आजी ॥ झालों धन्य जगामाजी ॥ १ ॥**

**सुसंगताः**—( रडत रडत त्याच्याजवळ जाऊन ) आर्या वसंतका, अंमळ उभा रहा.

**वसंतकः**—( तिच्याकडे पाहून ) सुसंगते, तूं इकडे कोणीकडे आलीस ? आणि अशी मुळमुळ रडतेस कां ? तुझी प्रियसखी सागरिका खुशाल आहेना ?

**सुसंगताः**—( सुस्कारा टाकून व कपाळाला हात लावून )

काय विचारतोस? तें तसलं अप्रिय वर्तमान सांगण्याचे माझ्या नशिबीं आलं आहे. त्या बिचारीला उज्जनीस पाठविल्याचा पुकारा करून मध्यान्हरात्रीच्या सुमारास बाईसाहेबांनीं कोणीकडे नेऊन ठेवलं आहे तें कांहीं समजत नाहीं. (अधिक रडूं लागते.)

**वसंतकः**—(शोकस्वरानें) हाय हाय! सागरिके, हे त्रिभुवनैक भूषणबाले, हे मृदुभाषिणी! खरोखर देवीनें हें फार निर्दयपणाचें कृत्य केलें. असो आतां भगवंता, तिला तूं जिवंत ठेव म्हणजे झालें. मग पुढें—

**सुसंगताः**—(रत्नमाला पुढें करून) पुढें तिला आपण आतां देवीच्या हातून वांचत नाहीं असें वाटून तिनें ही रत्नमाला आपल्या गळ्यांतून काढून तुला देण्याकरितां माझ्याजवळ दिली आहे. ती ही घे.

**वसंतकः**—(शोकपूर्वक) शिव शिव! अगे सुसंगते, अशा प्रसंगीं ही रत्नमाला घ्यावयास माझे हात पुढें तरी कसे सरसावतील?

**सुसंगताः**—(हात जोडून) माझ्या प्रियसखी सागरिकेवर अनुग्रह करण्याकरितां ही आपणास घेतलीच पाहिजे.

**वसंतकः**—आण तर मग ती. हिच्या योगानें मी सागरिकेच्या विरहानें उत्कंठित झालेल्या माझ्या प्रियमित्राचें थोडें बहुत तरी सांत्वन करीन. (रत्नमाला हातीं घेऊन व निरखून पाहून) सुसंगते, कायगे, असला हा अमोलिक दागिना सागरिकेला कोठून मिळाला?

**सुसंगताः**--अरे, या संबंधानें प्रथम मलाही मोठं आश्चर्य वाटल्यावरून दिला मीही या विषयीं एकदां विचारिलं होतं.

**वसंतकः**—मग? तिनें तुला काय सांगितलें?

**सुसंगताः**—त्या वेळेस तिनं वर पाहून मोठा सुस्कारा टाकला व "सुसंगते, बाई, हें विचारून तुला काय करावयाचें आहे?" असं बोलून बिचारी डळडळां रडूं लागली.

**वसंतकः**—(विचार करून) बरोबर असें असेल तर ती कोण्या मोठ्या राजाची कन्या असली पाहिजे. कारण-ही अशी

माळ मांडलिकाला मिळणें दुर्लभ व त्याच्या संग्रहीं राहणें अशक्यच. ती एखाद्या सार्वभौम ह्मणविणाराचीच मुलगी असावी यांत संशय नाहीं. असो; पण या वेळीं माझा प्रियमित्र कोठें आहे तें तुला माहित आहे काय?

**सुसंगताः**—होय, महाराज नुक्तेच राणीसाहेबांच्या महालांतून निघून स्फटिकशिलामंडपांत गेले आहेत; तर तूं तिकडे जा आणि मीही राणीसाहेबांच्या सेवेस जातें. (असें बोलून दोघेंही निघून जातात.)

**[ हा प्रवेशक झाला. ]**

(तदनंतर स्फटिकशिलामंडपांत आसनस्थ राजा प्रवेश करितो.)

**राजाः**—(विचार करून.)

पद—"दिसली पुनरपी गुप्त०" या चा०

**प्रसन्न करण्याकरितां कांता ॥ यत्न किती तरि मी केला ॥ खोट्या आणा लाखों वाहुनी ॥ प्रियकर झालों मग तिजला ॥धृ०॥ गोड मधुर बहुं वदलों वचनें ॥ बघुनि तिच्या त्या वृत्तीला ॥ कपटें लज्जायुक्त अशा ह्या ॥ खालीं केलें वदनाला ॥ पायां पडलों परोपरीनें ॥ सखिजनही तिज बहु वदला ॥ मग रमणीनें बाष्पजलानें ॥ निज कोपानल शांतविला ॥ १ ॥**

असो. याप्रमाणें एकंदरींत राणी तर प्रसन्न झाली. आतां मला कायती सागरिकेचीच चिंता पडली आहे. कारण—

पद—"नीरक्षीरालिंगनरूपी०" या चा०

**कमल तंतुसम कोमल सुंदर तनु ती तव दर्शनकालीं ॥**
**प्रेमभरानें कंठालिंगन देतां तन्मय किति झाली ॥**
**त्या वेळीं मज कामानें शर मारुनि छिद्रें पाडियलीं ॥**
**त्यांतुनि माझ्या हृदयीं प्रमदा आहे वाटे शिरलेली ॥ १ ॥**

हा एक प्रकार. त्याचप्रमाणें वसंतक हा माझ्या विश्रांतीचें स्थान होता; पण त्यालाही राणीनें प्रतिबंधांत ठेविलें आहे. तेव्हां आतां सागरिकेच्या संबंधानें जें दुःख होत आहे तें कोणाजवळ सांगावें?

**वसंतकः**—( प्रवेश करून व एकीकडे पाहून ) हा पहा माझा प्रिय मित्र; निरंतर लागलेल्या उत्कंठेनें कृश झाला आहे; तरी स्वाभाविक सौंदर्यानें शुक्रद्वितीयेच्या चंद्राप्रमाणें फारच शोभत आहे. ( राजाजवळ जाऊन ) मित्रा, तुझें कल्याण असो. दैवानें तुझा उदय झाला आहे; कारण मी राणीच्या हातांत सांपडलों असूनही ह्या डोळ्यांस पुनः तुझें दर्शन होत आहे हें तरी मोठेंच भाग्य असें समजावयाचें.

**राजाः**—( पाहून हर्षानें ) काय? हा माझा प्रियमित्र वसंतक आला! मित्रा, अगोदरच मला गाढालिंगन दे बरें!

**वसंतकः**—( आलिंगन देऊन ) मित्रा, देवीनें आणखी मजवर प्रसादही केला.

**राजाः**—तुझ्या ह्या पोषाखावरूनच देवीचा प्रसाद समजतो आहे तें असो रे; अगोदर मला त्या प्रिय सागरिकेचें वर्तमान सांग. ( हें ऐकतांच वसंतक खिन्न होऊन खालीं पाहूं लागतो. ) गड्या, तूं कांहीं सांगत नाहींस हें काय?

**वसंतकः**—माझ्यानें बाबा अप्रिय गोष्ट सांगवत नाहीं.

**राजाः**—( घाबरून ) अरे, अप्रिय ह्मणतोस तें काय? तिनें खरोखर प्राणत्याग का केला? हर हर! प्रिये सागरिके, एकूण शेवटीं तूं मला सोडून गेलीसना! ( मूर्छित पडतो. )

**वसंतकः**—( घाबरून ) प्रियमित्रा, सावध हो सावध हो!

**राजाः**—( सावध होऊन. )

पद—" मी कुमार तीहि कुमारी० " या चा०

**प्राणानों झडकरी आतां ॥ सोडुनि जा या अद्याला ॥ तुह्मि तरी सरळ व्हा ऐका ॥ ऐका रे मम वचनाला ॥ ॥ चाल ॥ रे तुह्मी न झडकरी जातां ॥ पहा फसाल हं हं ह्मणतां ॥ ती सुंदरि बघतां बघतां ॥ जाईल दूर देशाला ॥ मग भेट न हो त्या सखिची ॥ सांगतों स्पष्ट तुह्माला ॥ १ ॥**

**वसंतकः**—गड्या, उगीच भलतीच गोष्ट मनांत आणूं नको. त्या बिचारिला राणीनें उज्जनीस पाठविलें, असें मी ऐकिलें व त्यावरून अप्रिय असें बोललों.

**राजाः**—काय? तिला उज्जनीस पाठविलें? खरी गोष्ट ही? तर राणीची मजवर फारच करडी नजर आहे असें ह्मणावयाचें. बरें, पण हें वर्तमान तुला कोणी सांगितलें?

**वसंतकः**—मला त्या सुसंगतेनें सांगितलें. आणखी काय हेतुनें तें नकळे, तिनें ही रत्नमाला सुसंगतेच्या हवालीं करून ही मुद्दाम मलाच घ्यावयाला सांगितलें.

**राजाः**—मित्रा, हिच्या दर्शनानें माझें यत्किंचित् तरी शांत्वन व्हावें, एवढाच हिचा हेतु, दुसरा काय असणार? तर आण पाहूं ती इकडे. ( रत्नमाला घेऊन निरखून पाहतो आणि प्रेमानें उराशीं लाऊन )

**पद**–राग भैरवी–ताल त्रिवट.

**कंठांतुनि ही माळा ॥ सखिच्या कंठातु० ॥ धृ० ॥**
**कैसी आली नकळे येथें ॥ सोडुनि तत्संगतिला ॥ १ ॥**
**समदुःखी मत्तनुही जाणुनि ॥ ये समजुत करण्याला ॥२॥**

मित्रा, ही तूं आपल्याच गळ्यांत घाल; ह्मणजे हिच्या योगानें तरी मी आपल्या मनाचें समाधान करून घेईन. (असें बोलून ती रत्नमाला वसंतकाजवळ परत देतो. )

**राजाः**—( डोळ्यांस पाणी आणून व सुस्कारा टाकून ) गड्या, खरोखर त्या प्रियेचें दर्शन होणें दुर्लभ आहे आतां!

**वसंतकः**—(भ्याल्यासारखें करून) अरे, असें मोठ्यानें तरी बोलूं नकोस. कदाचित् कोणी राणीकडचा मनुष्य येथें फिरत असेल! तर तो ऐकेल.

( इतक्यांत वेत्रवती वसुंदरा प्रवेश करिते. )

**वसुंधराः**—महाराजांचा जयजयकार असो! महाराज सेनापति रुमण्वान् यांचा भाचा विजयवर्मा, हा सरकारांत कांहीं अर्ज करण्या-

करितां दारांत उभा राहिला आहे. आतां यावर महाराजांचा हुकूम होईल त्याप्रमाणें करीन.

**राजाः**—वसुंदरे, असें आहे, तर लौकर जाऊन त्याला आंत आण.

**वसुंदराः**—आज्ञा महाराज. ( जाते व विजयवर्म्यासह येऊन ) विजयवर्मन्, हे महाराज बसले आहेत. आपण त्यांच्याजवळ जावें.

**विजयवर्माः**—( राजाजवळ जाऊन ) महाराजांचा जयजयकार असो! महाराज, सेनापति रुमण्वान् यास आपण स्वारीवर पाठविलें होतें; त्याचा तिकडे जय झाला आहे!

**राजाः**—( आनंदानें ) विजयवर्मन्! काय ह्मणतां? कोशलदेश काबीज झाला!

**विजयवर्माः**—होय महाराज, आपल्या चरणप्रसादानें.

**राजाः**—शाबास! सेनापते, शाबास!! अल्पकाळांत तूं महत्कृत्य केलेंस! विजयवर्मन्, ही हकीकत विस्तारपूर्वक ऐकण्याची माझी इच्छा आहे. तुह्मीं येथून गेल्यापासून काय काय तजविजी केल्यात.

**विजयवर्माः**—महाराज, आह्मीं आपला हुकूम घेऊन निघालों, ते हत्ती, घोडे, पायदळ इत्यादि मोठें अफाट सैन्य बरोबर घेऊन, विंध्यापर्वताच्या खोऱ्यांत फौजेचा तळ देऊन बसलेल्या कोशलराजाच्या येण्याचा मार्ग धरून तेथेंच तळ दिला. आणि आपली फौज जिकडेतिकडे व्यवस्थेनें मांडून, सेनापति रुमण्वानानें त्याचीं सर्व द्वारें रोधून धरिलीं.

**राजाः**—वा! असें काय! बरें मग पुढें?

**विजयवर्माः**—पुढें त्या कोसलेश्वरासही आमच्या सेनापतीनें केलेली रचना सहन न झाल्यामुळें त्यानें मोठ्या रागानें, ज्यांत बहुतेक हत्तीच आहेत असें अफाट सैन्य तयार केलें.

**वसंतकः**—( मध्येंच ) अरे बाबा, अंमळ हळू हळू सांग. ही तुझी लढाईची गोष्ट ऐकून देखील माझें काळीज थरथर कांपतें. तुह्मी लोक कसले कठोर आहां कोणाला ठाऊक? अरे, तुह्मांला मनुष्य ह्मणण्यापेक्षां राक्षस ह्मणणें चांगलें. असें मला वाटतें.

**राजाः**—( विजयवर्म्यास ) बरें, मग पुढें काय झालें?

**विजयवर्माः**—ऐकावें महाराज.

पद—" आकर्षुनि धनू कठिणतनूतें० " या चा०

विंध्य-नगोदर सोडुनि जेव्हां, आला कोसल नृपति पुढें॥ गिरिशिखरांसम भासुं लागले, गज योद्धे ते चौंहिकडे ॥ धृ० ॥ हयपदातियुत सैन्यासह मग, केले क्रूरपणें झगडे ॥ वीरमुगुट बहु पाडुनिगाजी, रुमण्वान् संगेंहि भिडे ॥ रागें शर बहु सोडुनि घाली, अंगावरि गज जसे कडे ॥ रणधीरा प्रति पाहुनि ती कृति सत्य सांगतों शौर्य चढे ॥ विं० ॥ १ ॥

महाराज पुढें—

पद—" बसंती बघुनि मेनकेला० " या चालीवर.

बघुनी शौर्य तया अरिचें ॥ त्वरें धांवले स्वयें त्यावरि सेनापति अमुचे ॥ धृ० ॥ क्रोधावेशें शस्त्रांचे ॥ प्रहार करिती वर्मे लक्षुनि दोघे ही साचे ॥ वाहती पूर अश्रुद्राचे ॥ मरति अतिशय कोणी पळती प्राण भयें साचे ॥ तुटले करपद कोणाचे ॥ कोणी भडाभड रक्त ओकती वरिले शस्त्रांचे ॥ यापरि दोन्ही पक्षांचे ॥ वीर भूतलीं पडले ते कथुं काय तुह्मा वाचे ॥ १ ॥

**राजाः**—त्यांत आमचें सैन्यही पुष्कळ नाश पावलें नां? हरहर !

**विजयवर्माः**—असें खरें, परंतु आमचा सेनानायक रुमण्वान् अतिशय कुपित होऊन त्यानें—

साकी.

मत्त गजावरी बसला असतां कोशल नरपति शूर॥
शत बाणांनीं विंधियलें, त्या योगें जय हो फार॥
ऐसि सर्व कथा॥ केली विदित अवनिनाथा॥ १ ॥

**वसंतकः**—महाराजांचा जयजयकार असो. आह्मांला जय मिळाला!!! जय मिळाला!!!

**राजाः**—शाबास! कोशल नृपते शाबास!! तुला मरण आलें तथापि तें मोठें वर्णनीय होय. कारण शत्रुदेखील तुझा पराक्रम वर्णन करितात. असो. मग काय झालें?

**विजयवर्माः**—महाराज, याप्रमाणें कोशलराजा युद्धभूमीत पडल्यावर आपले सेनापती रुमण्वान् यांनीं त्याच्या राज्याची व्यवस्था करण्याकरितां माझा वडील बंधु जयवर्मा याची त्या कामावर योजना केली आणि शस्त्रप्रहारानें जखमी झालेली आपली फौज बरोबर घेऊन ते मागाहून येत आहेत. तरी हें आनंदकारक वर्तमान महाराजांच्या चरणीं निवेदन करण्याकरितां मी घाईघाईनें पुढें आलों.

**राजाः**—वसुंधरे, यानें जयाचें वर्तमान आणलें तर यास योग्य बक्षीस द्यावें. असें प्रधान यौगंधरायण यांजकडे जाऊन सांग.

**वसुंधराः**—आज्ञा महाराज. ( विजयवर्म्यासह जाते )

**कांचनमालाः**—( प्रवेश करून व राजाजवळ जाऊन ) महाराजांचा जयजयकार असो. महाराज, बाईसाहेबांची अशी विज्ञप्ति आहे कीं,–"कोणी सुवर्णसिद्धि या नांवाचा जादुगार उज्जनी शहरांतून आला आहे; तर त्याचा खेळ आपण पहावा."

**राजाः**—फारच उत्तम आहे. आम्हांलाही गारुड्याचा तमाशा पाहण्याचा फार शोक आहे, तर त्याला आंत घेऊन ये लौकर.

**कांचनमालाः**—महाराज, आज्ञेप्रमाणें करितें. ( जाते व हातांत मोराचा कुंचा घेतलेल्या जादुगारासह प्रवेश करिते. )

**जादुगारः**—

पद–"देखो करके ख्याल०" या चालीवर.

**खासे महाल विशाल, अंतीं नाहीं फसाल, जाल हैं हैं ह्मणतां, यमसदनीं ॥ ही त्यजा चमन, मनि करा मनन, ते गुरुचरण तुह्मि दिनरजनीं ॥ धृ० ॥ गुरुधीर उदार, खेळ खेळे अपार, नाहिं पार जयाचा, त्रीभुवनीं ॥ मीं मूळमंत्र, करिं धरुनि सूत्र, आजि खेळ दाविती नृपसदनीं ॥ गुरुकृपें जगांत, ह्माझा धरील हात, या जादुविद्येंत, असा नाहीं**

**कुणी ॥ माझी पाहुनि ढब, नृप होइल अजब, मग गजब उडवितों, सकल जनीं ॥ १ ॥**

**कांचनमालाः**—असा असा ये. हे समोर महाराज बसले आहेत. हो पुढं.

**जादुगारः**—( राजाजवळ जाऊन ) महाराजांचा जयजयकार असो. ( सभोंवतीं कुंचा फिरवून व नाचल्यावर. )

**साकी.**

**जादुगिरांचा परम गुरु जगिं इंद्रप्रभु जो त्याला ॥**
**आधीं वंदन करुनि नमितों शंबरसुरपदकमलां ॥**
**ज्याची जगिं कीर्ति ॥ गाजे चहूंकडे पुरती ॥ १ ॥**

महाराज, आपणांस माझ्या विद्येचे कोणकोणते खेळ पहावयाचे आहेत? अथवा इतर गोष्टी क्षणभर एकीकडे राहोत. आपली जर इच्छा असेल तर—

**पद**—"दंग होउनि रंगेले" या चालीवर.

**इंद्र चंद्र विधि विष्णु शिवाप्रति दाखवितों प्रत्यक्ष इथें ॥ सिद्धचारणासहित अप्सरा नाचवितों सांगाल तिथें ॥ धृ० ॥ हुकुम मात्र द्या वेळ नच मुळीं ॥ काय दाखवूं खेळ या स्थळीं ॥ चंद्र आणुं कीं काय भूतळीं ॥ अग्नि पेटवूं काय हिमजळीं ॥ गमेल तें वद मातें ॥ तोषवि आपुल्या चित्तातें ॥ इंद्र चं० ॥ १ ॥**

**वसंतकः**—( राजास ) मित्रा, याजकडे विशेष लक्ष पुरीव बरें. याचा डौल तर खूप दिसतो आहे. आणि हा बोलतो त्याप्रमाणें करील असेंही वाटतें आहे.

**जादुगारः**—महाराज, आपल्या मनांत जें जें पहावयाचें असेल तें तें सर्व गुरुनें सांगितलेल्या मंत्राच्या प्रभावानें मी आपणांस करून दाखवीन. आतां फार काय सांगावें? तरी—

**पद**—"तिच्या स्तनांमध्यें न स्थान०" या चालीवर.

**जरूर स्वर्ग भूवरी क्षणांत आणुनी ॥**

घराहि दावितों तुह्मांस स्वर्गीं नेउनी ॥ ध्रु० ॥
स्वर्ग मृत्यु पाताल लोक हे तिन्ही ॥
देईन महासागरांत असेच फेंकुनी ॥
अगम्य खेळ हा तुह्मांस सकल दाउनी ॥
करीन तया सद्गुरूस धन्य या जनीं ॥ १ ॥

**राजा**—:( जादुगारास ) अरे ए जरा थांब. ( कांचनमालेस. ) तूं लौकर अंत:पुरांत जाऊन प्रियेस माझा असा निरोप सांग कीं, जादुगार तुझ्या माहेराकडीलच आहे; यत्त्याशिवाय या वेळेस दुसरें परकी असें कोणी नाहीं. तर तूंही हा खेळ पाहण्याकरितां यावेंस, ह्मणजे आपण उभयतां एकत्र बसून याच्या विद्येचा चमत्कार पाहूं.

**कांचनमाला**:—आज्ञा महाराज. ( जाते व वासवदत्तेसह परत येते. )

**वासवदत्ता**:—अग कांचनमाले, तो गारुडी कीं नाहीं माझ्या माहेरचा आहे; ह्मणून मला त्याचा अभिमान वाटतो.

**कांचनमाला**:—बाईसाहेब, आपणांस त्याचा अभिमान वाटणं हें आपल्या मोठेपणास भूषणच आहे, तर आतां लौकर पुढें चलावं. हे महाराज बसले आहेत.

**वासवदत्ता**:—( राजाजवळ जाऊन ) प्राणनाथांचा जयजय-कार असो.

**राजा**:—आलीस! बरें झालें. येथें बैस आतां. आपण उभयतां एकत्र बसून हा काय करतो तें पाहूं.

**वासवदत्ता**:—( राजाजवळ बसते व गारुड्यास ) हं, चालूं दे आतां तुझा खेळ.

**जादुगार**:—( अनेक प्रकारांनीं नाचून व कुंचा फिरवून. ) चल चल चल.

## पद.

ओं नमो आदेश गुरुला वीर विरा ताता ॥

बांध बांध बांध पाणी पवनहि बलवंता ॥ धृ० ॥
बांध बांध मागें बांध, बांध पुढें, आज्जु, बाज्जु ॥
हे भगवान् ॥ तो स्वर्गहि बांध, ॥ हा मृत्युहि बांध, ॥
तो पातालहि बांध, ॥ माझ्या भक्ति प्रमाण ॥
तुझि शक्तिहि सत्य हो ॥ ओं नमो० ॥ १ ॥

चल चल चल चल, आवबे हंडीबाग.

हंडीबागः—( प्रवेश करून. ) जी हुकूम.

जादुगारः—( त्याचा हात धरून. ) हंडीबाग बडा अलबेला, हात हालावे, पाव हालावे, भाले भोले लोक भुलावे; अबे हंडीबाग.

हंडीबागः—जी हुकूम.

जादुगारः—आदिपुरुष निर्गुण निराधारकी याद कर, मेरे गुरू परवर दिगारकी याद कर, गैबीखजीना हमना दिया उस साहेबकी याद कर, संत महंतकी याद कर, गुणी गुणवंतकी याद कर, ( स्वागत ) जोग जुगतका बांधा तोडा, शमदमका शिरपर संबला छोडा, समता सोडी सुहावे तुरा, गुरू गारुडी बीर पुरा, नैन चारकी पैन्ही मुद्रा, कान फाडके खाये निद्रा, अनुहात धुनकु मुख बजावे, नागसूर धनु गर्जे, चल चल चल चल चल, ( कुंचा फिरवून व नाचून ) आवबे हंडीबाग.

हंडीबागः—जी हुकूम.

जादुगारः—बाप बडा क्या बेटा बडा.

हंडीबागः—बेटे आगे बाप खडा.

जादुगारः—गुरु बडा क्या चेला बडा.

हंडीबागः—चेले आगे गुरू खडा.

जादुगारः—धनी बडा क्या चाकर बडा.

हंडीबागः—चाकर आगे धनी खडा.

जादुगारः—सास बडी क्या बहु बडी.

हंडीबागः—बहु आगे सास खडी.

जादुगारः—बिबी बडी क्या बांदी बडी.

हंडीबागः—बांदी आगे बिबी खडी.

**जादुगारः**—तै बडा क्या मै बडा.

**हंडीबागः**—मेरे आगे तै खडा.

**जादुगारः**—चल चल चल चल चल आवबे हंडीबाग.

**हंडीबागः**—[ हात जोडून ] जी हुकूम.

**जादुगारः**—खेलना होय सो उलट दृष्टीसे खेल, अवी करूंगा फैल तेरी मुंडी काटुंगा. सापसे भुले बिच्छु कीडेपर पंचकोटी पारेमो आनकर पडे, बडे बडे जनावर पाले, हारे, लाले, जरदे, उजले, काले, पीले, चल चल चल, देखो मीया हाय हाय डंख मारा, बे डंख मारा, सो बडे बडे सो नहीं उतारा, चल चल चल, आवबे हंडीबाग.

**हंडीबागः**—जी हुकूम.

**जादुगारः**—ग्यानीकु ग्यान लगाऊ, लोभेकु, अंधेकु उडाऊ, फूक मारुतो जा जा जा जा जा, बोधके पहाडपर जावे जा, जाहां-आना नहीं, जाना नहीं ताहां जा, मेरे सद्गुरू दाताकी ईतीसीण करी, मुल्मंतर हातमें पकरी, जिदर दवरा उदर दवरी, फेर देखतो मेरी मेरेसात; अबे हंडीबाग.

**हंडीबागः**—जी हुकूम.

**जादुगारः**—अबी करूंगा खबुतरका तमासा, बिनपर उडता है खासा, देख तो आभी खलीतेमें घुसा, तो बाहेर कैसा आवेगा, आव बे आव बाहेर आव, जिसे नहीं हात ना पाव, जिसे नहीं गांव ना ठाव, जिसे रूप रेखा, कच्छु वही भाव, आव आव आव, आवबे हंडीबाग.

**हंडीबागः**—जी हुकूम.

**जादुगारः**—हंडीबाग, एकबार ऐसा खेल खेलूसो मेरे बडे बडे खेलैथे हातो एक, एकके दो, दोकेतीन, तीनके चार, चारके पांच, पांचके पचीस, पचीसके छात्तिस, छत्तिसका एक, एकबी नहीं, तो जादुगार देख. ( कुंचा फिरवून व अनेक प्रकारें नाचून ) चल चल चल चल चल. [ राजास ]

पद—"इंद्र चंद्र विधि विष्णु शिवाप्रति०" या चा०

**प्रमुख असे सुर विधि हरि शंकर सुरपति सह सुर**

सकल नभीं ॥ दिव्य वधू बघ दिसती विधुसम नाचताति या रम्य नभीं ॥धृ०॥ मंत्रशक्ति ही माझि पाहुनी ॥ शांत हो नृपा आपुल्या मनीं ॥ सांग कोणता अन्य याहुनी ॥ खेळ दाखवूं नृपचुडामणी ॥ दाविन जें ॥ इच्छिसि तें ॥ गुरूकृपेनें उभाउभीं ॥ प्रमुख० ॥ १ ॥

( सर्व आश्चर्ययुक्त होऊन पाहूं लागतात. )

**वसंतकः**—काय आश्चर्य हें! वाहवा वाहवा!! शाबास रे गारुड्या!!!

**वासवदत्ताः**—अग बाई! काय तरी याचं विलक्षण कसब हें!

**राजाः**—

**पद**–"किती तरी पहांटेची वेळ०" या चा०

प्रिये पहा कमलावर बसलेला ब्रह्मदेव हा ॥ प्रि० ॥ धृ० ॥
अर्धांगी कृत नारी ॥ चंद्रसहित गंगा शिरीं ॥
नंदिवहन चर्मधारी ॥ देव हा महा ॥ प्रिये प० ॥ १ ॥
शंख चक्र अयुधावलि ॥ शोभतसे करकमलीं ॥
कमलाधव या वेळीं ॥ कैंवि शोभला ॥ प्रिये प० ॥ २ ॥
हे इकडे सुर दिसती ॥ दिव्य वधू नाचताती ॥
नूपुररव रम्य किती ॥ होय हा पहा ॥ प्रिये प० ॥ ३ ॥

**वासवदत्ताः**—खरंच, प्राणनाथ. कायहो चमत्कार हा ?

**वसंतकः**—( एकीकडे जादुगारास ) अरे, रांडलेंका जादुगारा हे देव, गंधर्व दाखवून काय करतोस! आमच्या ह्या महाराजांकडून तुला बक्षिस लाटावयाचें असेल तर एक वेळ ती सागरिका आणून याला दाखीव ह्मणजे झालेंच तुझें काम.

( इतक्यांत वसुंधरा प्रवेश करिते. )

**वसुंधराः**—महाराजांचा जयजयकार असो. महाराज, प्रधान यौगंधरायण अशी विनंती करितात कीं, सिंहलेश्वर विक्रमबाहूनें आपला मुख्य प्रधान आपणाकडे पाठविला आहे. आणि त्याची भेट

घेण्यास या वेळीं मुहूर्तही चांगला आहे. तर आपण त्याची भेट घ्यावी, तोंपर्यंत मीही हातांतलें काम पुरें करून आपणांकडे येतों.

**वासवदत्ताः**—प्राणनाथ, या वेळेस याचा हा खेळ राहूं या. पुढं केव्हां तरी पाहतां येईल. अगोदर माझ्या मामाकडून प्रधान वसुभूति आला आहे त्याची आपण लौकर भेट घ्यावी.

**राजाः**—प्रिये, तुझी अशी इच्छा आहे तर तसेंच करितों. ( गारुड्यास ) अरे, या वेळेस तुझा हा खेळ राहुंदे. आह्मांला आतां अवश्यकतेचें काम आहे. तर या वेळीं आटप. पुनः एखादे वेळीं पाहूं.

**गारुडीः**—( असें ऐकतांच पुंगी फिरवून. ) महाराजांची जशी आज्ञा. तरी सरकार, माझा एक अद्भुत खेळ अजून राहिला आहे; तो कृपा करून महाराजांनीं पहावा अशी विज्ञापन आहे.

**राजाः**—ठीक आहे. अवश्य पाहूं बरें.

**वासवदत्ताः**—कांचनमाले, जा आणि याला चांगलें बक्षिस देवीव.

**कांचनमालाः**—आज्ञा बाईसाहेब. ( गारुड्यासह जाते. )

**राजाः**—मित्रा, प्रधान वसुभूतीस सामोरा जाऊन घेऊन ये बरें.

**विदूषकः**—आज्ञा महाराज. ( जातो. )

तदनंतर वसंतकासह वसुभूती व बाभ्रव्य हे येतात. )

**विदूषकः**—प्रधानजी, असें इकडून यावें.

**वसुभूतिः**—( आसमंताद्भागीं पाहून ) अहाहा !! या वत्सेश्वराचें वैभव तरी किती हें ! हे शृंगारलेले हत्ती पहावे कीं हे इकडचे खासे घोडे पहावे. किंवा इकडून संगीताचा मधुर ध्वनी येत आहे तो ऐकावा ! जिकडे पाहावें तिकडे मनाला थक्क करून सोडणारे प्रकार दृष्टीस पडतात. फार काय सांगावें एखादा गांवढळ मनुष्य राजवाड्यांत गेला ह्मणजे त्याची जशी भांबावल्यासारखी स्थिति होते, तशी फक्त हें देवडीवरील ऐश्वर्य पाहून माझी झाली आहे.

**बाभ्रव्यः**—वसुभूते, माझीही तशीच अवस्था झाली आहे कारण, आज बहुत दिवसांनी महाराजांचें दर्शन होणार ह्मणून;—

पद-"ठेवुनि॰प्रीति दुर्लभ॰" या चालीवर.

**झाला तोष अतुल मनाला ॥ साह्य देत बहु आज जरेला ॥ ॥ धृ० ॥ आनंदाश्रु नयनीं पातले ॥ ह्मणुनि मार्गही न दिसे मजला ॥ वार्धक्यानें तनु ही कांपे ॥ शक्ति नसे पद उचलायाला ॥ १ ॥**

**वसंतकः**—( पुढें होऊन ) यावें यावें प्रधानजी, असें इकडे यावें.

**वसुभूतिः**—( वसंतकाच्या गळ्यांत रत्नमाला पाहुन एकीकडे ) बाभ्रव्या, सिंहलेश्वरानें रत्नावलीला वत्सराजाकडे पाठवितेवेळीं—प्रस्थानसमयीं जी रत्नमाला रत्नावलीच्या गळ्यांत घातली होती; ती हीच असावी. बरें तूंहि अंमळ लक्ष्यपूर्वक खरें कीं नाहीं तें पहा बरें.

**बाभ्रव्यः**—( नीट पाहून. ) प्रधानजी, आपण ह्मणतां तें खरेंसें वाटतें. बरें, पण ती याच्याजवळ कोठून आली? याबद्दल विचारून खुलासा काढूं का?

**वसुभूतिः**—छे छे, असें विचारणें योग्य नाहीं. अरे हा वत्सेश्वर आहे. याच्या संग्रहीं अशीं रत्नें नसतील असें कोणी मानावें?

( पुढें चालतात. )

**वसंतकः**—( सिंहासनावर बसलेल्या राजास दाखवून. ) हेच आमचे महाराज वत्साधिपति! आपण त्यांच्याजवळ चलावें.

**वसुभूतिः**—( जवळ जाऊन ) महाराजांचा जयजयकार असो!

**राजाः**—( उठून ) मी आपणांस वंदन करितों.

**वसुभूतिः**—महाराज, आपलें सदा कल्याण असावें हीच इच्छा.

**राजाः**—अरे, कोण आहे रे? यांना बसावयाला आसन आण.

**वसंतकः**—( आपलें अंगवस्त्र आंथरून. ) इदमासनम्! प्रधानजींनीं यावर कृपा करून बसावें.

**बाभ्रव्यः**—( पुढें होऊन ) महाराज, मी बाभ्रव्य आपणांस वंदन करितों.

**राजाः**—(त्याची पाट थोपटून) बाभ्रव्या बैस येथें, कसें काय! ठीक आहेना?

**बाभ्रव्यः**—(बसतो.)

**वसंतकः**—प्रधानजी, देवी वासवदत्ता आपणास वंदन करित आहे.

**वासवदत्ताः**—प्रधानजी, मी आपल्यास वंदन करितें.

**वसुभूतिः**—आयुष्मति, तुला वत्सराजाप्रमाणेंच लवकर पुत्ररत्न होवो.

**बाभ्रव्यः**—राणीसाहेब, मी बाभ्रव्य आपणास वंदन करितों.

**वासवदत्ताः**—बाभ्रव्या, तुझें कल्याण असो.

**राजाः**—आर्य वसुभूते, सिंहालाधिपति क्षेम आहेतना?

**वसुभूतिः**—(वर पाहून व स्वासोच्छ्वास टाकून) महाराज, या कपाळ फुटक्यानें आतां काय सांगावें. हें कांहींच सुचत नाहीं. (असें बोलून खालीं तोंड करून बसतो.)

**वासवदत्ताः**—(विषाद पावून आपल्याशीं.) हाय! हाय!!

श्लोक-हरिणीवृत्त.

**वदन करुनी खालीं कां हा उगाचचि राहिला ॥**
**नयन सलिला ढाळी ऐसा कधीं न विलोकिला ॥**
**अघटित मनीं येती यातें विकल्प बघोनियां ॥**
**भय मम मना वाटे वार्ता पुढें परिसावया ॥ १ ॥**

**राजाः**—वसुभूते, सांगा सांगा! शंकित व व्याकूळ झाल्यासारखें कां?

**बाभ्रव्यः**—(एकीकडे वसुभूतीस.) सांगा झालें. कांहीं वेळानें तरी सांगितलें पाहिजेचना आपणांस?

**वसुभूतिः**—(साश्रु) खरोखर माझ्यानें सांगवत नाहीं; तरी दैवीं आलें तें चुकत नाहीं, म्हणून सांगतों:—"आमचे महाराज सिंहलेश्वर विक्रमबाहु यांची कन्या रत्नावली, तिच्याविषयीं एका महा सिद्धानें भाकित केलें होतें कीं, जो तिला वरील तो सार्वभौम होईल. या भविष्यवाणीवर विश्वास ठेवून आपल्या यौगंधरायण प्रधानजींनीं ती कन्या आपणांसाठीं विक्रमबाहूजवळ अनेक वेळां मागितली. तरी देवी वास-

वदत्तेस वाईट वाटेल. असें मनांत आणून आमच्या विक्रमबाहू महाराजांनीं ती कन्या आपणांस देण्याचें नाकारिलें."

**राजा:**—( एकीकडे वासवदत्तेस ) तुझ्या मामाचा प्रधान हें असें काय भलतें भलतें बडबडतो आहे हें? यौगंधरायणानें तिकडे जाऊन मागणी केली कधीं?

**वासवदत्ता:**—( विचार करून ) आतां यांत कोण खोटं बोललं हें मला कळत नाहीं.

**वसंतक:**—बरें, पण मग त्या रत्नावलीचें काय झालें?

**वसुभूति:**—नंतर देवी वासवदत्ता लवणपुरांत जळाली असें तिकडे कळवून या बाभ्रव्य कंचुकीच्याद्वारें आपण त्या कन्यारत्नाबद्दल सिंहलेश्वराची पुनः प्रार्थना केली; तेव्हां जडलेला आप्तसंबंध तुटूं नये ह्मणून सिंहलेश्वरानें ती रत्नावली आपणांस देण्याचा निश्चय केला. व त्याप्रमाणें तिच्यासह, आह्मांला जलमार्गानें आपणांकडे यावें ह्मणून एका तारवांत बसवून समुद्रांतून पाठविलें. पण समुद्रांतून येत असतां तें तारूं फुटलें व ती राजकन्या रत्नावली—

( इतकें बोलून रडूं लागतो )

**वासवदत्ता:**—काय? रत्नावली समुद्रांत बुडाली! हाय हाय!

पद—"नोहे हा पवन जवन०" या चा०

**रत्नावलि प्रिय भगिनी भुवनसुंदरी ।।**
**पाहुं कुठें सांग सांग तुजसि मी तरी ।। ध्रु० ।।**
**गुणगणाचि रम्य झरी ॥ आटलीस सखये खरी ।।**
**मीन जळावीण परी ॥ धीर कसा धरिल तरी ॥**
**तुजविण हें जगत दिसे शून्य अंतरीं ।। रत्ना० ॥ १ ॥**

**राजा:**—प्रिये, थोडासा विवेक कर आतां रडून काय होतें? त्यांतही दैवाची गती विचित्र आहे, हा बाभ्रव्य आणि प्रधान वसुभूति हे दोघे तिच्याबरोबर बुडालेलेच वांचून आलेना? यांच्याप्रमाणेंच तुझी बहीण वांचली नसेल कशावरून?

**वासवदत्ता:**—आपलं ह्मणणं खरं आहे; पण, यांच्याप्रमाणं

तिचीही भेट होईलच. असं कशावरून मानावं? इतकी दैववान् मी कुठं आहें?

**राजाः**—अरे बाभ्रव्या, या वसुभूतीनें काय सांगितलें तें बरोबर समजलें नाहीं. यांतली खरी माहिती तुला असेल तर सांग.

**बाभ्रव्यः**—होय महाराज, ऐकावें तर.

( इतक्यांत पडद्यांत मोठी गडबड होते. )

**पडद्यांत शब्दः**—आग! आग!! अरे धांवा! अरे राजगृहास आग लागल्यामुळें उपवनांतील वृक्ष जळताहेत व त्यांच्या ज्वाला आकाशापर्यंत चालल्या आहेत. सर्व क्रीडामंदिरें ज्वालांनीं व्याप्त झालेलीं आहेत. आगींत सांपडलेल्या स्त्रियाही आक्रोश करीत आहेत. तर कोणी धांवा आणि त्यांचें रक्षण करा!! पूर्वी लवणपुरांत राणी जळाल्याबद्दल्ची बातमी खोटीच उठली होती, ती खरी होण्यासाठीं हा अंतःपुरांत अग्नि पेटला आहे!!!

( सर्व घाबरून पाहतात. )

**राजाः**—( घाबरून ) काय? देवी वासवदत्ता जळाली? ती कशी? आणि अंतःपुरांत हा अग्नि तरी कसा लागला?

**वासवदत्ताः**—अहो धांवा! धांवा! आणि रक्षण करा!

**राजाः**—अरे, काय हा वेडेपणा! ही राणी माझ्याजवळ असतां लक्षांत नाहीं हें काय? ( असें बोलून वासवदत्तेचा हात धरून तिला आलिंगन देतो. ) देवी, सावध हो! सावध हो!! भिऊं नको!!!

**वासवदत्ताः**—प्राणनाथ, मी स्वतःकरितां घाबरलें असं नाहीं. म्यां निर्दयेनं त्या सागरिकेच्या पायांत बिड्या घालून तिला ह्या जळणाऱ्या अंतःपुरांतच कोंडून ठेवलं आहे, यासाठीं धांवा आणि आधीं तिचं संरक्षण करा!

**राजाः**—असें काय? अगे, पण तिला तूं उज्जयनीस पाठविलें होतेंसना? चिंता नाहीं. ती येथेंच आहे काय? तर घाबरूं नको मी तिला आतां बाहेर घेऊन येतों. ( आगींत शिरण्याची तयारी करतो. )

**वसुभूतिः**—महाराज, विनाकारण पतंगाप्रमाणें प्राणघात करून घेण्यास अग्नींत उडी टाकणें हें योग्य नाहीं.

**बाभ्रव्यः**—महाराज, वसुभूति खरें बोलतात. आपण त्यांचें ऐकावें.

**वसंतकः**—( राजाच्या अंगावरचा शेला धरून ) अरे बाबा, तुझ्या पायां पडतों. भलतेंच करूं नको. ऐक, माझें ऐक.

**राजाः**—हा मूर्खा! सागरिका जळत असतां हे माझे प्राण येथें राहतील असें मानतोस ? ( शेला हिसकावून जातो. )

**राजाः**—( आगींत जाऊन धुरानें गुदमरल्यासारखें करून. )

**पद**—" जों जों दिसती शैलाचीं हीं " या चालीवर.

**व्हावें शांत अतां हे अग्ने सकल कोप त्यजुनी ॥**
**ज्वालांसह हा धूम्र आंवरी पूर्ण दया करुनी ॥ धृ० ॥**
**किमर्थ वद रे ज्वालांचें हें जाळें पसरोनी ॥**
**दाखविसी मज रूप आपुलें क्रूर फार करुनी ॥**
**त्या सुंदरीचा विरह अनावर जैसा प्रळयाग्नि ॥**
**त्यांतहि नाहीं दग्ध जाहलों जाणकिरे स्वमनीं ॥ १ ॥**

सागरिकेला चोहोंकडून अग्नीनें घेरलें आहे काय? चिंता नाहीं. जातो तिच्याजवळ तिला सोडविण्यासाठीं.

**वासवदत्ताः**—अहो, कसली मी चांडाळीण ! माझ्या सांगण्यावरून प्राणनाथांनीं अग्नींत प्रवेश केला ? तर मीही त्यांच्या मागून जावें हेंच योग्य आहे. ( असें बोलून राजाच्या मागून जाते. )

**वसंतकः**—( पुढें होऊन ) बाईसाहेब, थांबा थांबा, मी आपणांस मार्ग दाखविण्यासाठीं पुढें होतों. एकट्याच जाऊं नका ! ( वासवदत्तेच्या मागून अग्नींत जातो. )

**वसुभूतिः**—हाय हाय ! वत्सराजानें अग्नींत प्रवेश केला. तर मला तरी वांचून काय कर्तव्य आहे ? त्या राजकन्येची अशी मरण दुर्वार्ता ऐकून जिवंत राहण्यापेक्षां या शरीराची अग्नींत आहुती पडलेली फार चांगली ! ( सर्वांच्या पाठीमागून जातो. )

**बाभ्रव्यः**—( रडून ) हाय हाय ! महाराज, अहो महाराज, व्यर्थहो हें भरतकूलजीवित संशयांत पाडलेंत ! तर स्वामिभक्तिला अनुसरून मीही प्राणत्याग करावा हें फार चांगलें ! ( जातो. )

( तदनंतर आगं लागलेल्या अंतःपुरांत पायांत बिड्या असलेली सागरिका प्रवेश करिते. )

**सागरिकाः**—हाय हाय ! चोहोंकडे अगदीं अग्निमय होऊन गेलं आहे ! अथवा होतं हेंही उत्तमच होय.

**राजाः**—अरेरे ! सागरिकेला अग्नीनें अगदीं चोहोंकडून वेढून टाकलें आहे ! ( चट्कन तिच्याजवळ जाऊन ) अग वेडे अद्यापि तुं अगदींच स्वस्थ कशी राहिलीस ? असो. आतां हुशारी धर भिऊं नको.

**सागरिकाः**—( राजास पाहून मनांत ) काय हा आर्य पुत्र ! याला पाहतांच मला वांचण्याची इच्छा उत्पन्न झाली ! ( उघड )

पद—"राग मालकंस. ताल दादरा," या. चा.

**तारिं तारिं तारिं मला पुरुषपुंगवा ॥**
**तुजविण नच साह्यकारि अन्य येधवां ॥धृ०॥**
**इंदुपरी रम्य मूर्ति ॥ पूर्ण ताप संहर्ती ॥**
**पाहुनियां येत चित्ति ॥ धन्यता जिवा ॥ ता० ॥ १ ॥**
**हीन दीन भूवरती ॥ तडफडते त्या न मिती ॥**
**साह्यकारि तूंच अंति ॥ हे कृपार्णवा ॥ ता० ॥ २ ॥**

**राजाः**—अग भित्रे, आतां कां भितेस ?

## दिंडी.

**सहन करि हा क्षणभरी धूर येथें ॥**
(तिच्याकडे पाहून)**अशी अडखळशी कशासाठिं कांते ॥**
(पायाकडे पाहून) **मृदुल चरणीं हा बिड्या भार होतो ॥**
(कंबर बांधून) **मार कंठीं मिठि तुला दूर नेतों ॥ १ ॥**

**सागरिकाः**—( राजाच्या गळ्यास मिठी मारते. )

**राजाः**—(स्पर्श सुखामुळें डोळे मिटून मान हालवितो.) अहाहा !

काय चमत्कार हा! अहो, हा अग्नि एका क्षणांत नाहींसा कसा झाला? प्रिये सागरिके, सावध हो! सावध हो!! भीति सोड.

( कामदाच्या चालीवर. )

**अग्नीनें जरी स्पर्शिलें तुला ॥**
**तरि न जाळि हा शीत जाहला ॥**

कारण कीं—

**स्पर्श तव सखे होय जैं मला ॥**
**ताप सर्व ही शांति पावला ॥ १ ॥**

( डोळे उघडून व पाहून ) अरे, एकाएकीं काय चमत्कार झाला हा! ( विचार करून )

**पद**–"कुपित होऊनी भ्रुकुटि॰" या चालीवर.

**स्वप्न असे कीं इंद्रजाल हें नकळे मजला कांहिंच अजुनी ॥**
**पेटत होता अग्नि या स्थलीं गेला कोठें कैसा विझुनी ॥**
**॥ धृ० ॥ अंतःपुर हें दिसतें निर्मळ होतें जैसें तैसें नयनीं ॥**

( वासवदत्ता येते, तिला पाहून )

**अवंति नृपजा मत्प्रियकांता कैसी आली ही या स्थानीं ॥**

( वसंतक, वसुभूति आणि बाभ्रव्य हे येतात; त्यांस पाहून. )

**बाभ्रव्यासह वसुभूतिहि, हा मित्र वसंतक मत्प्रियसगुणी॥**
**सर्व यथास्थित दिसतें, नकळे काय असे प्रभुची ही करणी ॥ १ ॥**

**वसंतकः**—मित्रा, संशय नको. इंद्रजालच हें! मघाशीं तो जादुगार आला होता, त्या बटकिच्यानें सांगितलेंच होतें कीं, "महाराजांनीं माझा आणखी एक चमत्कारिक खेळ राहिला आहे तो पहावा, अवश्य पहावा." तर तोच हा असावा असें मला वाटतें.

**राजाः**—देवी, तुझ्या आज्ञेप्रमाणें सागरिकेला येथें आणली आहे. अग, हिला त्या प्रचंड अग्नींतून काढून बाहेर नेण्याकरितां उचलून घ्यावें लागलें आहे; तर त्याबद्दल तूं रागावूं नको.

**वासवदत्ताः**—( हंसून ) महाराज आपल्या मनांत काय आहे तें सगळें मी समजलें आहे. विनाकारण ही संपादणी कशाला हवी?

**वसुभूतिः**—( सागरिकेस पाहून एकीकडे ) बाभ्रव्या, ही कन्या आपल्या सिंहलेश्वर महाराजांच्या रत्नावलीसारखी हुबेहुब दिसते, नाहीं बरें ?

**बाभ्रव्यः**—प्रधानजी, माझ्याही मनांत हेंच आलें आहे.

**वसुभूतिः**—( राजास ) महाराज, ही मुलगी आपणांकडे कोठून व कशी आली ?

**राजाः**—तें मला कांहीं माहित नाहीं. सर्व या देवीला माहित आहे.

**वासवदत्ताः**—प्रधानजी, आमचे प्रधान यौगंधरायण यांनीं "ही सागरांत सांपडली !" असं सांगून माझ्या हवालीं केली. तेव्हां-पासून हिला आह्मीं सर्व सागरिका असं ह्मणत असतों.

**राजाः**—( आपल्याशीं ) काय ? यौगंधरायणानें हिला देवीच्या हवालीं केली ? पण मला कळविल्याशिवाय तो अशी गोष्ट कशी व कां करील !

**वसुभूतिः**—बाभ्रव्या, हें बऱ्याच अंशांनीं जुळल्यासारखें वाटतें. कारण, वसंतकाच्या गळ्यांतील रत्नमाला रत्नावलीच्या गळ्यांतील माळेसारखी दिसते आणि ही मुलगीही सागरांत मिळाली असें ह्मण-तात; तर निःसंशय ही आमच्या महाराजांची कन्या रत्नावलीच होय. ( तिच्या जवळ जाऊन ) आयुष्मती रत्नावली, अग लाडके, तुला ही अशी अवस्था कशी प्राप्त झाली ?

**सागरिकाः**—( त्याला पाहून रडत रडत ) कोण, प्रधान वसु-भूति काय ?

**वसुभूतिः**—होय, तोच मी दैवहीन ! ( असें बोलून धाडकन् खालीं पडतो. )

**सागरिकाः**—

पद—"किति चंचल ही दिसते॰" या चा

**हा तात, हे मत्प्रिय माते ॥ पाहुं कुठें तरि मी तुह्मांतें ॥ धृ॰ ॥ अग्निवांचुनी स्मृति ही तुमची ॥ रक्षा करिताहे या तनुची ॥ उदास भासे हें जग मातें ॥ तळमळ वाट-तसे चित्तातें ॥ १ ॥ बोला बोला मजशीं कांहीं ॥ जातें त्रासुनियां स्वर्गी ही ॥ अंतकाळिं मज कोणी नाहीं ॥ काय ह्मणावें या दैवातें ॥ २ ॥**

( भूमिवर पडून मूर्छा पावते. )

**वासवदत्ताः**—( घाबरून ) बाभ्रव्या, माझी मांऊस बहीण रत्नावली ती हीच काय?

**बाभ्रव्यः**—राणीसाहेब, होय. तीच ही.

**वासवदत्ताः**—( रत्नावलीस आपल्या जवळ घेते. )

**राजाः**—काय ह्मणतां? महाकुलीन व पराक्रमी जो सिंहलेश्वर विक्रमबाहु त्याची ही कन्या?

**वसंतकः**—( रत्नमाला हातांत घेऊन ) प्रथम मला वाटलेंच होतें, हा असा अलंकार सामान्य मनुष्याजवळ असणें कठीण ह्मणून.

**वसुभूतिः**—( सागरिकेजवळ जाऊन ) राजकन्ये, सावध हो, सावध हो, आणि ही तुझी वडील बहीण तुझ्याकरितां दुःख करीत आहे, तिला आलिंगन दे.

**सागरिकाः**—( सावध होऊन व वक्रदृष्टीनें राजाकडे पाहून एकीकडे आपल्याशीं ) माझ्या योगानें बाईसाहेबांना फारच त्रास झाला! तर आतां हें मुख त्यांनां दाखवावं तरी कसं हेंच मला कळत नाहीं. ( अधोमुख उभी राहते. )

**वासवदत्ताः**—( डोळ्यांत पाणी आणून व हात पुढें करून. ) अगे माझे प्रिय भगिनी, किती ग ही तुझी निष्ठुरता? असो. आतां तरी जवळ येऊन निःसीम आणि निर्मळ असं जें भगिनी प्रेम, तें व्यक्त कर. ( असें बोलून तिला पोटाशीं धरते. )

**सागरिकाः**—( अडखळल्यासारखें करीत पुढें येते. )

**वासवदत्ताः**—( राजाकडे पाहून ) आर्यपुत्र, ही इच्या पायांतील बिडी पाहून मला माझ्या क्रूरपणाची लाज वाटते. यासाठीं हिच्या पायांतलं बंधन हें हलूच कसं तरी काढून टाकायचं व्हावं.

**राजाः**—देवीची आज्ञा उल्लंघन कोण करणार आहे? ( सागरिकेला बंधनमुक्त करितो. )

**वासवदत्ताः**—प्राणनाथ, प्रधान यौगंधरायणांनीं मजकडून हें फारच निर्दयपणाचें कृत्य मुद्दाम जाणून करविलें असें ह्मटलें पाहिजे.

( इतक्यांत प्रधान यौगंधरायण प्रवेश करितो. )

**यौगंधरायणः**—

पद्–"शैवल विरहित पु॰" या चालीवर.

**जरि त्या देविस दुःख दिलें ॥ परि मज यश हें सुरुचिर**

आलें ॥ धृ० ॥ अन्य स्त्रीरत कांत पाहुनी ॥ असेल दुःखचि बहु झालें ॥ सार्वभौम नरपति अवलोकुनि ॥ तोषद होईल हें ठरलें ॥ १ ॥

असा प्रकार आहे तरी राणीला तोंड दाखविण्याची मला लाज वाटते. परंतु–

पद—"सखे अशी धरीसि कां०" या० चा०

करग्रहण करुनि हिचें वत्स नरमणी ॥
सार्वभौम होईल तो श्रेष्ठ या जनीं ॥
उचंबळेल तोष तया देविच्या मनीं ॥
तरि मुखास दाउं कसें पुढति जाउनी ॥

पण काय करावें? स्वामिभक्तीचें व्रत अत्यंत मान्य व पूज्य असलेल्याच्या ठिकाणीं देखील केव्हां केव्हां अगदीं निर्दयपणानें वागल्याशिवाय साधत नाहीं. कारणः—

( मागील चाल )

हितेच्छु जो तयास उक्त समय जाणुनी ॥
वागणेंच योग्य असे सौख्य साधनीं ॥ १ ॥

अथवा खेद करून तरी काय उपयोग? ( निरखून पाहून ) हे महाराज बसले आहेत; तर आतां त्यांच्याजवळ जातों ( जवळ जाऊन ) महाराजांचा जयजयकार असो! महाराजांस न कळवितां केलेल्या या गोष्टीची महाराजांनीं मला क्षमा केली पाहिजे.

**राजाः**—काय ह्मणतां? मला न कळवितां! अशी कोणती गोष्ट ती.

**यौगंधरायणः**—महाराज, आपण आसनावर बसावें, नंतर काय केलें तें मी आपणांजवळ सांगतों ( सर्व बसल्यावर हात जोडून ) महाराज, ही सिंहलेश्वराची कन्या; हिच्याविषयींः—

साकी.

सिद्धवचन तें असें असे कीं जो नर वरील हीतें ॥
सार्वभौम तो होउनि भोगिल या साऱ्याही महितें ॥
ऐसें मज कळतां ॥ केला यत्न तुह्मां करितां ॥ १ ॥

परंतु देवी वासवदत्तेला दुःख होईल, ह्मणून त्यानें माझ्या मागणीकडे लक्ष्य दिलें नाहीं. नंतर—

**राजाः**—नंतर काय झालें?

**यौगंधरायणः**—नंतर लवणपुरांत देवी जळाली अशी खोटी वार्ता उठवून मी सिंहलेश्वरापाशीं या बाभ्रव्य कंचुकीस पाठविलें.

**राजाः**—यौगंधरायण प्रधानजी, पुढचें वृत्त मला कळलें आहे. बरें हिला देवीच्या स्वाधीन करण्याचा काय हेतु?

**वसंतकः**—मित्रा, हेतु अगदीं उघड आहे. त्यांना कशाला विचारावयाला पाहिजे? तें मला समजलें आहे. ही कन्या अंतःपुरांत असली म्हणजे सहजच आपण तेथें जातां तेव्हां ती आपल्या दृष्टीस पडावी.

**राजाः**—प्रधानजी, वसंतक म्हणतो असाच तुमचा अभिप्राय होता कीं काय?

**यौगंधरायणः**—होय महाराज, असाच होता.

**राजाः**—बरें, त्या गारुड्यानें जो चमत्कार केला, तोही तुमचाच उपदेश असावा असें वाटतें तर?

**यौगंधरायणः**—होय महाराज, असें न करितों तर अंतःपुरांत कोंडून ठेवलेल्या रत्नावलीचें दर्शन महाराजांस कसें झालें असतें? व प्रधान वसुभूति यांनीं तरी हिला पाहिल्यावांचून कशी ओळखली असती? ( अंमळ हंसून ) असो, जें झालें तें ठीकच झालें. रत्नावली ही आपली बहीण आहे असें राणीसाहेबांलाही आतां समजलें. तर पुढें काय करावयाचें तें त्यांना माहित आहेच.

**वासवदत्ताः**—( गालांतल्यागालांत हंसून ) प्रधानजी, रत्नावलीचें पाणिग्रहण प्राणनाथांनीं करावं; असं स्वच्छच कां म्हणांना?

**वसंतकः**—राणीसाहेब, प्रधानजींचा अभिप्राय आपण बरोबर जाणला!

**वासवदत्ताः**—( हात पुढें करून ) अग, रत्नवली, ये अशी जवळ पाहु. आतां तरी बहिणीच्या प्रेमाला अनुरूप असं माझ्या हातून कांहीं होऊंदे. ( असें बोलून आपले अलंकार तिच्या अंगावर घालते. नंतर तिला हातीं धरून राजास ) महाराज, या रत्नावलीचा आपण अंगिकार करावा.

**राजाः**—( हर्षानें हात पुढें करून ) देवीचा प्रसाद कोण बरें अमान्य करणार आहे?

( सागरिकेचा हात धरण्यास पुढें होतो त्याचें निवारण करून. )

**वासवदत्ताः**—( मध्येंच ) प्राणनाथ, अगोदर मी सांगते हें ऐका—

पद—"राग-भैरवी, ताल-त्रिवट."

**वृष्टि करा प्रेमाची ॥ इजवरि वृ० ॥**

**सजलचि जलदा परि सुदयेची ॥ धृ० ॥**

**इचीं न येथें जनानि, जनक ते ॥ यास्तव कथितें मी तुझातें ॥ मज न लाजतां किमपिहि येथें ॥ हृदयिं धरावी साची ॥ नाथा वृष्टि० ॥ १ ॥**

( सागरिकेचा हात राजाच्या हातांत देते. )

**राजाः**—( आनंदानें सागरिकेचा हात धरून ) देवी, तुझ्या आज्ञेप्रमाणें वागेन बरें.

**वसंतकः**—( हर्षानें नाचून ) वाहवा! मोठी आनंदाची गोष्ट झाली! महाराज, आपला जयजयकार असो! आतां सर्व पृथ्वी आपल्या हातांत आली असें समजा.

**वसुभूतिः**—राजकन्ये रत्नावली, देवीवासवदत्तेला नमस्कार कर.

**रत्नावलीः**—( वासवदत्तेच्या पायां पडते. )

**बाभ्रव्यः**—राणीसाहेब, आपल्याला देवी ह्मणतात हें अगदीं योग्य आहे. जिच्या अंतःकरणांत एवढें औदार्य व पतीविषयीं प्रेम तिलाच ही बहुमानाची पदवी मिळत असते.

**वासवदत्ताः**—मला एकटीलाच हा मान कशाला हवा? ही माझी लाडकी बहीण रत्नावली देखील 'देवी' या संबोधनास योग्य आहे.

**राजाः**—अहाहा! आज माझे सर्व श्रम सफल झाले.

**यौगंधरायणः**—महाराज, आणखी काय आपलें प्रिय करावें तें सांगा.

**राजाः**—यापरतें आणखी प्रिय तें काय करावयाचें राहिलें आहे.

पद—"नाहिं सुभद्रा या वार्तेतें० " या चा०

**त्वत्सम असतां सचिव धुरंधर काय उणें मजला ॥**
**धन्य जाहलों पाहुनियां तव योग्य विक्रमाला ॥ धृ० ॥**
**सार्वभौम मी व्हावें यास्तव या रत्नावलिला ॥**
**अनेक युक्ती करुनि मिळविलें भूषविलें मजला ॥**

भगिनीच्या लाभानें झाला तोषहि देवीला ॥
शत्रु जिंकुनी विक्रमबाहु प्राणसखा केला ॥ त्व० ॥ १ ॥

हें सर्व ठीकच झालें, तरी हें भरतवाक्य असो.

श्लोक–"पृथ्वी छंद."

करो अमर पालक प्रचुर वृष्टि या भूवरी ॥
मही तृणकणादिकें सुफलिता असावी पुरी ॥
असोत बहु तृप्त ते विबुध, संतसंगें भला ॥
सुबुद्धि उपजो सदा मति असो सदा कोमला ॥ १ ॥

---

## पुस्तककर्त्याची ईश्वरास प्रार्थना.

पद–"मदनारि ॥ गौरी०" या चालीवर.

रणधीर ॥ रामराया ॥ जानकि मनरमणा ॥
सुखकर ॥ दशकंधरकदना दे भजनीं सुमती ॥ धृ० ॥
प्रभु रूप तुझें ॥ मज दाउनी ॥
अविनाशि दे पद अंतीं ॥
प्रपंच मजला ॥ निष्फळ गमला ॥
अंत न लागे मायेचा ॥
रचुनि कवनसुमन हें ॥ चरणकमलिं तव ईशा ॥
अर्पुनि विनति करितसे ॥ सुप्रिय होवो सकलांला ॥
तारिं तारिं प्रभो बलवंत किंकरा ॥
अन्य न आसरा ॥ सुखधामा ॥
श्रीरामा ॥ दे प्रेमा ॥ दुरितें तीं ॥
वारि सारिं ॥ तारिं तारिं प्रभो० ॥ १ ॥

